# प्राक्शब्द

बी. ए.च्या परीक्षेसाठीं मराठी पद्य-वाङ्मयाचा सन १६१० ते १७२० आणि गद्य-वाङ्मयाचा सन १८२० ते १८७० हे काळ नेमिले आहेत. या दोन्ही काळांत वाङ्मयाची स्थिति कशी होती, त्याची प्रगती कशी होत गेली, आणि त्या वेळीं मुख्य मुख्य कवी आणि ग्रंथकार आणि ग्रंथ कोणते झाले, याची चर्चा या लहानशा पुस्तकाच्या पहिल्या दोन निबंधांत केली आहे. परीक्षेच्या वेळीं उत्तरें लिहिण्याची आयती तयारी विद्यार्थ्यांस साध्य करून देण्याचा या निबंधांचा उद्देश नाही. तत्संबंधी प्रत्यक्ष तयारी विद्यार्थी स्वतां मेहनत करून शिक्षकांच्या साह्यानें करितीलच. विद्याक्रमांत विषय नेमिलेले असतात त्यांचा उद्देश केवळ परीक्षा पास करून घेणें एवढाच नसून, ते ते विषय पुढील आयुष्यक्रमांत उपयोगीं पडण्यासाठीं हस्तगत करावयाचे असतात. भाषाविषयाच्या संबंधानें तर हा उद्देश विशेष महत्वाचा असतो. कारण कोणत्याही विषयाच्या प्रतिपादनास चांगल्या भाषेचें साह्य असावें लागतें. यासाठीं मराठी भाषा आपल्यास चांगली यावयास हवी आहे; आणि आतां फार वर्षांच्या प्रयत्नांनीं मराठीला विद्यामंदिरांत प्रवेश मिळाला आहे, तेव्हां तिचा अभ्यास चांगल्या प्रकारें होऊन तिची प्रगती झाली पाहिजे आहे. या दृष्टीनें वाङ्मयाच्या निरनिराळ्या अंगांचा अभ्यास कसा करावा हें कळावें, आणि त्या अभ्यासास साह्य व्हावें, ह्या हेतूनें हा प्रयत्न केला आहे. यांत विषयाची माहिती कशी मिळवावी, त्यासाठीं काय वाचावें आणि कोठें वाचावें हें सांगितले आहे. त्याचप्रमाणें, विषयाचा विचार आणि विषयाची चर्चा कशी करावी याची दिशा थोडी थोडी चर्चा करून दाखविली आहे. कोणत्याही ग्रंथांतून उतारे न घेतां अमुक गोष्टीच्या संबंधाची माहिती कोठें मिळेल ह्याचें ठिकठिकाणीं निदर्शन केलें आहे. त्यामुळें विद्यार्थी ती माहिती स्वतां मिळवितील आणि त्यांना ग्रंथ वाचण्याची गोडी आणि संवय लागेल. इंग्रजी भाषेचा अभ्यास करितांना त्यासंबंधाच्या अनेक पुस्तकांचें साह्य मिळतें. तशा प्रकारचीं पुस्तकें मराठींत अजून झालीं नाहींत, यामुळें

वाचणारांना आपणास साह्य कोठें मिळेल हें कळण्याचाही मार्ग नसतो. तसेंच हा अगदीं नवीन विषय असल्यामुळें अभ्यास करावा कसा, हेंही अजून फारसें ठाऊक नाहीं या संबंधानेंही या पुस्तकापासून साह्य मिळेल; आणि अशा प्रकारचें साह्यभूत वाङ्मय कसें बनवावें, ह्याची दिशाही कळेल.

तिसरा निबंध मराठी भाषेचे प्रख्यात निबंधकार विष्णुशास्त्री चिपळूणकर यांच्या लेखांवर लिहिलेला आहे. यांचे निबंध परीक्षेसाठीं वाचण्यास नेमले असून तसे ते नेहमीं नेमले जातीलच. तसेच, सांप्रतच्या गद्य मराठीच्या वळणाचा पाया घालून त्याची सुरवात करण्याचें काम चिपळूणकरांकडून झालें आहे. अनेक कारणांनीं चिपळूणकर यांचें प्रतिपादन आणि मतें यांसंबंधानें विपर्यास आणि गैरसमज फार झालेला आहे. ह्या गोष्टी दर वर्षास त्यांच्या श्राद्धतीथीच्या दिवशीं होणाऱ्या कोणाच्या तरी व्याख्यानांनीं वाढत आहेत. वाढत आहेत. त्यांचे लेख विद्यार्थी व्यवस्थेनें, आस्थेनें आणि चिकित्सेच्या दृष्टीनें वाचूं लागले असतां त्यांना आपण ज्यांच्या संबंधानें ऐकतों तें चिपळूणकर हेच कीं दुसरे, असा प्रश्न अलबत त्यांच्या पुढें उभा राहील. तेव्हां त्यांना चिपळूणकरांच्या लेखांविषयीं यथार्थ मत बनवितां यावें म्हणून या निबंधांत चिपळूणकरांच्या लेखांच्या साह्यानेंच विवरण केलें आहे. तें वाचतांना त्यांचे निबंध आणि या लेखांत निदर्शिलेले इतर ग्रंथ आणि लेख हे वाचकांनीं जवळ ठेवावे, म्हणजे स्वप्रत्ययाचें खरें मत बनवितां येईल.

चिपळूणकर यांनी भाषेचें मोठें कार्य केलें आहे. परंतु त्यांच्या उद्योगाचें विकृत स्वरूप बदलून खरें स्वरूप दृष्टीसमोर प्रघट झाल्या खेरीज त्याचे खरें सार्थक होणार नाहीं. यासाठीं आतां त्यांच्या लेखांचा अभ्यास सुरू झाला आहे, तर तो नीट आस्थापूर्वक झाला पाहिजे.

चिपळूणकरांचें हें केवळ वाङ्मयात्मक चरित्र आहे, असें म्हटलें पाहिजे. त्यांचा जीवनवृत्तांत आणि त्यांनीं केलेल्या देशकार्याची समग्र माहिती होण्यासाठीं रा० रा० नरसिंह चिंतामण केळकर यांनीं इंग्रजींत लिहिलेलें त्यांचें लहानसें सुंदर चरित्र विद्यार्थ्यांनीं अवश्य वाचावें. हें मद्रास येथील नटेसन कंपनीनें छापलें आहे.

# विषयानुक्रमणिका



# चुक्यांची दुरुस्ती

पृ० १३, ओळ ७ ‘भाष्यामध्यें’ बद्दल ‘भाष्यामधील.’

पृ० १३, ओळ १४, ‘भावे यांची’ बद्दल ‘भिडे यांची.’

# वाङ्मय-विवेचन

## १—मराठी पद्य-वाङ्मय

## सन १६१० ते १७२०

### १. पद्य-वाङ्मयाचा उद्गम—

आपल्या लोकांची प्राचीन काळापासून अशी समजूत होती कीं विद्या आणि तत्संबंधी वाङ्मय संस्कृतांत असावे. प्राकृत किंवा देशी भाषा या केवळ घरगुती व्यवहारापुरत्या. संस्कृत ग्रंथांतल्या विद्या फार तर प्राकृतांत लोकांना विद्वानांनीं समजून द्याव्या, आणि तेवढयावर लोकांनीं संतुष्ट राहावें. अशी व्यवस्था असल्यामुळें प्राकृत जनांनीं असंतुष्ट होऊन धर्मबंड केलीं. त्यांतलें शेवटचें बंड मराठी लोकभाषेच्या संबंधाचें होय. सुमारें बाराव्या आणि तेराव्या शतकांत परमार्थविद्येला पुष्कळ ऊत आलेला होता. परंतु ती विद्या विद्वानांनीं संस्कृतांतून नुसती समजून देण्यानें लोकांची तृप्ती होईना. त्यांना वाटे कीं हे सर्व आपल्याला आपल्याच मराठी भाषेंत कां न कळावें? त्या वेळीं मराठी भाषा अगदींच भिकार होती असे वाटत नाहीं. ज्ञानदेवानें तेराव्या शतकाच्या अखेरीस गीतेसारखा ग्रंथ त्याच्यावर विस्तृत व्याख्यान करून मराठींत आणला, तेव्हांची मराठी भाषा त्या उद्योगास चांगली पुरी पडली, आणि तो पहिलाच ग्रंथ उत्तम निपजला. यावरून भाषेची उणीव नव्हती, तर गहन विद्या मराठींत आणाव्या का नाहीं, हा प्रश्न होता. ज्ञानेश्वरीच्या भाषेची रचना, ओवी छंद, आणि ग्रंथ या दृष्टींची एकंदर व्यवस्था, या गोष्टी एकाद्या भाषेच्या अगदी आरंभीच्या स्थितींत जशा असावयाच्या, तशा कांहीं दिसत नाहींत. यावरून संस्कृत विद्वान लोकांच्या तोंडून जे ऐकलें, तें ध्यानीं धरून पुन्हा आठवावें, आणि मराठींत गुणगुणावें अथवा एकमेकांशीं बोलून त्यावर चर्चा करावी, हे चालू होतें. लेखनसामुग्री थोडी असल्यामुळें जें ध्यानीं धरावयाचें तें पाठ करण्यास आणि पुन्हा पुन्हा उच्चारण्यास सोपें जावें म्हणून कवितेंत रचावयाची चाल होती. अशा प्रकारच्या ओव्या,

साक्या, दिंड्या, पदें, अभंग वगैरे छंद होते. तेही इतके अजमावलेले होतेसें दिसतें कीं त्यांत रस उत्पन्न होण्यासाठीं अनुप्रास आणि यमकें बनवींत. तसेच या संबंधानें बोलतांना उपमा, दृष्टांत वगैरे सांगून आपलें म्हणणें ठसविण्याचे प्रयत्न चालत. अशा रीतींचे बरेंच आध्यात्मिक वाङ्मय त्या वेळीं लोकांच्या तोंडी व कवितेच्या रूपानेंही होते. तथापि अध्यात्मविद्यांची सुरवात मराठींत करावयाची तयारी नव्हती. पहिल्या प्रथमचा धीरच कोणाच्यानें होईना. तेव्हां आपल्याला त्या विद्या चांगल्या अवगत आहेत असा ज्याला आत्मप्रत्यय होता, ग्रंथ रचण्याचें कौशल्य आंगी होतें, आणि विद्वान लोकांच्या मताविरुद्ध जाण्याची धमक होती, असा ज्ञानदेव पुढें सरसावला आणि त्यानें ज्ञानेश्वरीसारखा ग्रंथ निर्माण केला. अशा रीतीने ज्ञानदेवानें प्रथमतः संस्कृत सुवर्णपात्रांतले ब्रह्मविद्यामृत मराठी भाष्यरूपी केळीच्या पानांच्या द्रोणांत घालून लोकांच्या पुढें ठेवल्यावर, आणि तें सुवर्णपात्रांतलेंच अमृत आहे, रानवट झाडपानांच्या द्रोणांतून प्राशिल्यानें त्याची गोडी यत्किंचित् कमी झाली नाहीं, असा लोकांना प्रत्यय आल्यावर मराठींत संस्कृतांतल्या विद्या आणण्यास सुरवात झाली. अशा प्रकारें प्रथमतः मराठी वाङ्मयाचा उद्गम झाला. तें पद्यमयच कां होऊं लागलें, हें सर्वांना ठाऊकच आहे. संस्कृत विद्या मराठींत आणून त्या जनतेस सुलभ कां करून देऊं नये, असा सर्व प्राचीन कवींचा प्रश्न आहे; आणि ही गोष्ट शास्त्रीपंडितांना कधींच आवडत नव्हती, म्हणून हा प्रश्न ज्ञानेश्वरापासून मोरोपंतापर्यंत सर्वांनी कंठरवानें विचारलेला आहे, आणि शास्त्रीपंडितांच्या विरोधास न जुमानतां शास्त्रें-पुराणें मराठींत आणण्याचा प्रयत्न केला आहे. हें मराठी पद्यवाङ्मयाचें मूळ आहे.

## २. पद्यवाङ्मयाचें साधारण स्वरूप—

आपल्या प्राचीन पद्य वाङ्मयाच्या स्वरूपाच्या संबंधानें निदान सध्या पाश्चात्य पद्धतीनें वाचणारे आणि अभ्यासणारे यांची चांगली समजूत नाहीं. त्यामध्यें पुढील दोष काढीत असतात—( १ ) तें काव्य नव्हे. ( २ ) तें केवळ भाषांतर आहे. ( ३ ) त्यांत जुन्या शिळ्या कल्पना असतात. ( ४ ) अशा कल्पना त्याच त्याच घेऊन सर्व कवी त्यांचा अनुवाद करीत असतात. ( ५ ) प्रत्यक्ष देखून वर्णिलेलें सृष्टिवर्णन नाहीं, स्वभाववर्णन नाहीं.

( ६ ) या कवींनीं आपल्या वेळची लोकस्थिती, भोंवताली चाललेल्या गोष्टी, इकडे मुळींच लक्ष दिलें नाहीं. इत्यादि, इत्यादि. हे दोष आपल्या प्राचीन पद्य-वाङ्मयांत सध्याचे दृष्टीनें आहेत यांत शंका नाहीं. परंतु ते आपण काढतों याचें कारण आपण ह्या वाङ्मयाकडे योग्यदृष्टीनें बघत नाहीं, हें आहे. प्राचीन पद्यरचना करणारांना ती वाचकांचें मन तिच्यामध्यें रमून तिचा रसास्वाद घ्यावा म्हणून केली नाहीं. तसेंच पाश्चात्य काव्यांशीं तुलना करून त्याचा पुढें कोणी अभ्यास करील, हें त्यांच्या ध्यानीं मनींही नव्हतें. हें वाङ्मय उत्पन्न झालें कसें, हें मागे सांगितलेंच आहे. तेव्हां परमार्थ-ज्ञान जें संस्कृतांत सांठविलेलें होतें, तें स्वभाषेंत हस्तगत होऊन मोक्षमार्ग सुलभ व्हावा, आणि जनता ईश्वरभक्तीच्या मार्गाला लावावी, ह्या हेतूनें प्राचीन कवींनीं हे ग्रंथ लिहिले. हा त्यांचा उद्देश साधला किंवा नाहीं, हेच मुख्यतः पाहावयाचें. आपले बहुतेक मराठी कवी केवळ विरक्तवृत्तीचे साधुसंत होते. त्यांना काव्य-रसांत गुंगण्याची लालसा नव्हती. काव्यरसाचा ज्यांना आस्वाद पाहिजे होता, त्यांना साधनें कमी नव्हतीं. संस्कृत ही आपलीच भाषा आहे, असें लोक समजत होते. संस्कृतांत पुष्कळ उत्कृष्ट काव्य होतें. तेव्हां ज्यांना इच्छा होती त्यांना त्यांत रममाण होण्यास हवी तेवढी सवड होती. मराठींत आख्यानमय कविता होऊं लागल्यावर तीमध्यें काव्यरसाची जेव्हां जरूर लागली, तेव्हां ज्यांच्यामध्यें **केवळ** साधुत्व नव्हतें अशा प्रकारचे मुक्तेश्वर, रघुनाथ पंडित, मोरोपंत वगैरे कवी यांनीं आपल्या कथांतून पुष्कळ काव्य आणिलें आहे. त्याचप्रमाणें आध्यात्मिक पद्यरचनेमध्यें जरी फारसें काव्य उत्पन्न करतां येत नाहीं, तरी भक्तिरसात्मक वर्णनांमध्यें मन तल्लीन होण्यासारखें पुष्कळ काव्य आणितां येतें. तशा प्रकारचें काव्य नामदेव, तुकाराम, वामन, यांच्या रचनेंत पुष्कळ आहे. तेव्हां मराठी पद्यग्रंथांत **मुळींच काव्य** नाहीं, अशी जी कित्येकांची भावना आहे, ती खरी नाहीं. आध्यात्मिक-विचारमय आणि गोड आख्यानपर असें, भक्तिरस उत्पन्न करून लोकांना तल्लीन करणारें नवीन प्रकारचें काव्य प्राचीन मराठी कवींनीं उत्पन्न केलें. तसें जुन्या संस्कृतांत नव्हतें आणि पाश्चात्य कवितेंतही सांपडणार नाहीं. या पद्यग्रंथांचा अभ्यास जसजसा जास्त होऊं लागेल, तसतसा या म्हणण्याचा प्रत्यय अधिकाधिक येऊं लागेल.

हें वाङ्मय म्हणजे केवळ संस्कृत मुळाचें भाषांतर आहे, हा दुसरा

आक्षेप. परंतु वास्तविक तें भाषांतरमय नाहीं. संस्कृतांतलें प्रत्येक वाक्य जसेंच्या तसें मराठींत उतरून दिलेलें असतें, तर तें भाषांतरमय झालें असतें. परंतु आपल्या कवींनीं तसें केलेलें नाहीं. त्यांनीं मूळसंस्कृतांतलें जेवढें जरूर ध्यावयास पाहिजे, तेवढेंच निवडून संक्षेपतः घेतलें आहे. मुळांत जें उत्तम वाटलें तें जसेंच्या तसेंच ठेवून दिलें आहे; आणि उपमा, दृष्टांत, उदाहरणें, विचार वगैरे गोड वाटले तेथें जशाचे तसेच घेतले आहेत. तसेंच अनेक प्रसंगीं मूळच्यांत भर घालून स्वतांच्या करामतीनें मुळाचें सौंदर्य वाढविलेंही आहे. तेव्हां हें भाषांतर नव्हे. आतां तें उष्टें आहे, अनुकरण आहे, अथवा संस्कृताचें केवळ प्रतिबिंब आहे, या आक्षेपांना उत्तर असें आहे कीं, संस्कृत भाषा ही मराठीची माता. त्याच प्रमाणें ती आपल्या लोकांच्या पूज्य धर्माची पवित्र वाणी. तिचें उष्टें घेणें, तिचें अनुकरण करणें, अथवा तिच्या स्वरूपाप्रमाणें आपलेंही रूप बनविणें यांत मराठीला अथवा कवींना कमीपणा नाहीं, अशीच तेव्हांची समजूत होती. त्यांतून संस्कृतांत आहे तेंच मराठींत आलें, याचा प्रत्यवाय मानणें हें जे संस्कृतपंडित असून मुळांतच त्या वाङ्मयाचा आस्वाद घेण्यास लायक होते, त्यांना मात्र कदाचित् योग्य आहे. सांप्रत आपल्यांपैकीं अनेकांचा जरी संस्कृताशीं पुष्कळ परिचय झाला असला, तरी जे आध्यात्मिक अथवा आख्यानमय ग्रंथ मराठींत आणले आहेत, त्यांचें परिशीलन मुळांत फार थोड्यांना साध्य आहे. यासाठीं पुष्कळ वाचणारांना तें स्वभाषेंतच वाचावयास आवडेल आणि त्याची गोडी ते मराठींतच घेतील; आणि 'तें उष्टें आहे,' हा आक्षेप त्यांच्याकडून येणें शक्य नाहीं. तिसऱ्या आणि चौथ्या आक्षेपाचें उत्तर असें आहे, कीं या कवींनीं जें लिहिलें, तें लोकांची आवड आणि भोंवतालची एकंदर परिस्थिती यांकडे लक्ष देऊन लिहिलें. ज्यांच्या करितां तें लिहिलें, त्यांना तें आवडलें, यांत त्यांच्या उद्योगाचें सार्थक झालें. 'हा संसार केवळ भ्रम आहे; कसा, तर रस्त्यांत पडलेली दोरी सर्पच आहे, असा भ्रम होतो, तसा.' अशा प्रकारची विचारसरणी सध्या आपणास कितीही पोरकट व शिळी वाटत असली, तरी त्या काळीं आणि अजूनही ती लोकमान्य आहे. पांचव्या आक्षेपाला उत्तर असें आहे कीं आपलें स्वतांचें आणि कांहीं अपूर्व असें त्या कवींनीं लिहिलें नाहीं. आपल्या

वेळच्या जनतेला जे ग्रंथ देवतांसारखे पूज्य वाटत होते, आणि ते कठीण भाषेंत असल्यामुळें त्यांतलि आनंदाचा अनुभव घेतां येत नव्हता, ते शक्य तेवढे जशाचे तसे साध्य करून घ्यावयाचे असा त्यांचा हेतू होता, तो त्यांनीं साधला. या कविमंडळाचे भोंवतालचे परिस्थितीकडे मुळींच लक्ष नव्हतें. जसें काय ते त्या काळचे नव्हतेच. ज्ञानदेवापासून मोरोपंतापर्यंतच्या काळांत देशामध्यें राजकीय आणि सामाजिक स्थित्यंतरें अनेक झालीं, राज्यांमध्यें उलटापालटी झाल्या, तरी त्यांना त्यांचा गंध हीं नव्हता.कारण या गोष्टी वर्णण्याचे आपलें कामच नाहीं, आपला उद्योगाचा आणि विचाराचा प्रांत अमदी निराळाच आहे, असें ते समजत होते. नाहीं तर प्राचीन वीरपुरुष आणि प्राचीन हृदयंगम प्रसंग ज्या कवींनीं इतके उत्तम वर्णिले आहेत, त्यांच्या मनांत असतें तर त्यांना शिवाजी, बाजिराव यांचे पराक्रम; राजाराम, नानासाहेब यांची राजकारणें, तसेच संभाजीचा वध अथवा पाणिपतचीं धुळधाण हे शोककारक प्रसंग, ह्या गोष्टी वर्णितां आल्या नसत्या असें नाहीं. असें करणें आपल्या कर्तव्यांतलें आहे, असें त्यांस वाटतच नव्हतें. तेव्हां तसें त्यांनीं केलें नाहीं म्हणून त्यांना नांव ठेवणें आपल्यास उचित नाहीं. हल्लींच्या वेळच्या लोकांस काय हवें हें त्यांनीं पाहिलें नाहीं. आपल्या वेळच्या लोकांना काय हवें आहे, ह्याचा अंदाज पाहून त्यांनीं लिहिलें. त्यांच्या काव्यादिकांचा आपणास जो अभ्यास करावयाचा आहे, तो मुख्यतः भाषावर्धनाचे संबंधानें करावयाचा आहे. त्याच्या बरोबरच या काव्यांतल्या कथा वगैरे गोष्टी ज्यांना मूळ संस्कृतांत साध्य नाहीत त्यांनी त्या स्वभाषेंत साध्य करावयाच्या आहेत. या गोष्टींसाठी जे अभ्यास करितात, त्यांना या ग्रंथांतून परिपूर्ण काव्यगुण सांपडत नाहींत म्हणून हळहळण्याचें कांहीं कारण नाहीं. भाषेच्या अभ्यासास योग्य अशा गोष्टी या ग्रंथांत पुष्कळ आहेत.

या साधुसंत कवींच्या उद्योगाचे संबंधानें या आक्षेपांच्या उलट अशी दुसरी एक समजूत आपल्या लोकांत आहे. ती अशी कीं, यांनीं पुढील कार्यभागाची जमीन तयार करून देशांत स्वाभिमान, कर्तव्यदक्षता, देशप्रीती वगैरे गोष्टी तयार करून ठेविल्या, म्हणून पुढें स्वराज्यस्थापना झाली. विचारपूर्वक पाहिलें तर ही समजूतही खरी नाहीं, असें दिसून येईल. वर सांगण्यांत आलेंच आहे कीं, यासंबंधानें या कवींच्या ग्रंथांत अवाक्षरही नाहीं. यांच्या

शिकविण्याने लोक केवळ भक्तीमध्ये तल्लीन होणारे, अल्पसंतुष्ट आणि शांत, सोसक, साधुवृत्तीचे असे बनले होते. सभोंवार कांहीं झालें तरी आपली भक्ति, आपल्या पंढरीच्या वाऱ्या, आपली देवतार्जनें आणि संप्रदाय, इत्यादि गोष्टी निर्वेध चालल्या म्हणजे झालें, राज्य कोणाचेंही असलें म्हणून आपल्यास त्याच्याशीं काय करावयाचें आहे, अशा त्यांच्या समजुती होत्या. कित्येक मुसलमान राजे, सरदार, वगैरे यांस त्यांनी आपल्या निस्सीम भक्तीचा प्रत्यय दाखवून संत बनविलें, प्रत्यक्ष शिवाजीही तुकारामाच्या शिष्यमंडळींत शिरण्याच्या बेतांत होता, रामदासाचा शिष्य तर तो झालाच होता, अशा दंत-कथा आणि आख्यायिका सुप्रसिद्धच आहेत. या संतांची शिवाजीच्या राज्यसंस्थापनेस साह्य करण्याची जर इच्छा असती, तर लाखों वारकऱ्यांना शिपाई बनवून त्यांची मदत शिवाजीस मिळवून देतां आली असती, आणि शिवाजीचें काम जें एवढें कठीण झाले होतें, ते फार सुकर झालें असते. याच काळामध्यें महाराष्ट्राप्रमाणेंच गुजराथ, पंजाब, उत्तरहिंदुस्थान, बंगाल वगैरे प्रांतांतही साधुसंत झाले आणि त्यांनी आपल्या कवाप्रमाणेंच परमार्थपर आणि भक्तिरसपर पद्यमय ग्रंथरचना केली आहे. त्यांच्या प्रयत्नांनी तिकडेही जमीन तयार होऊन स्वराज्यस्थापना कां झाल्या नाहींत? तेव्हां या साधुसंतांचे उद्योग आणि स्वराज्यस्थापनेचा उद्योग याचा मानण्यांत येतो तितका निकट संबंध मुळींच नव्हता. साधुसंत या संबंधानें निस्पृह होते. राज्यकारस्थानी पुरुषांनी मात्र शक्य तितका आपल्या कार्याला त्यांचा आशीर्वाद प्राप्त करून घेतला असेल आणि जनतेच्या मनांत राज्यधोरणां-विषयीं थोडा बहुत हुरूप उत्पन्न झाला असेल, एवढाच त्यांची मदत झालेली आहे. यासंबंधाची विशेष चर्चा पाहिजे असल्यास प्रि० पटवर्धन यांचा 'काव्य आणि काव्योदय' हा निबंध वाचावा.

या काळामध्ये ग्रंथरचना व कविता फार झालेली आहे. आध्यात्मिक विषयावर मराठीमध्यें पहिली रचना होण्याबरोबर भराभर पुष्कळ मंडळी लिहूं लागली. भगवद्गीता, भागवत दशमस्कंद आणि एकादश स्कंद, तशीच वेदान्त विषयावरील गीता, पंचदशी आदीकरून लहान मोठे ग्रंथ यांवर फार रचना झाली. त्या बरोबरच या प्रदेशांत वेदान्तपंथ आणि भक्तिमार्ग हे फार प्रसार पावले. ठिकठिकाणी संत उत्पन्न होऊन त्यांचे सांप्रदाय स्थापित

झाले. संत म्हटला की मग तो कवी असलाच पाहिजे, आणि त्यानें मग आपले जें काय धर्ममत असेल तत्प्रदर्शक ग्रंथ लिहिलाच पाहिजे, असें ठरल्या-सारखें झालें. त्याचप्रमाणें त्या काळचा कवी म्हटला म्हणजे त्याच्याकडे संतपण आपोआप चालत आलेच. अशा प्रकारचें सांप्रदायिक वाङ्मय अपरंपार आहे. जें काय लिहावेंसें वाटेल, ते कवितेंत-ओवीवृत्तांत-लिहावयाचें. यांत खरोखरी कवित्व किंवा पद्य नसून तें एक प्रकारचें नियमबद्ध गद्यच होय.

आपला वेदान्त आणि दुसऱ्या अध्यात्मविद्या ह्या फार गहन विचाराच्या आहेत. आपल्या विद्यार्थ्यांना त्यांचा विचार नको आहे. परंतु या मराठी संत-कवींची वेदान्त-तत्वे काय आहेत, याचे थोडे स्वरूप विद्यार्थ्यास कळले पाहिजे, म्हणून तें अगदी संक्षेपतः सांगतों – " जग हे मिथ्या आहे; त्यांत तत्त्व किंवा सार मुळीच नाहीं. ते मायेने उत्पन्न केलेला आभास अथवा भ्रम आहे. अर्थात् जगांतल्या गोष्टींच्या पाठीस लागणे, त्या मिळविण्याची इच्छा अथवा प्रयत्न करणें या गोष्टी मृगजळाच्या शोधार्थ धावण्यासारख्या वृथा आहेत: हें पहिले तत्त्व. मानवी आयुष्य जन्मल्यापासून मृत्यूपर्यंत क्लेशमय आहे. संसार दुःखमय आहे. मनुष्याला नापवयापासून नेहमीं पीडा होते; हे दुसरें तत्त्व. या जगांत एकच शाश्वत, नित्य, सत्य, अविनाशी व अनंत अशी जिन्नस आहे; ती परब्रह्म किंवा परमात्मा आहे. या परब्रह्माच्या मायेच्या योगानेंच सृष्टि उदयास येते किंवा विलयास जाते. अर्थात् ही सर्व सृष्टि विनाशी व अनित्य आहे: परब्रह्म मात्र अक्षय व टिकाऊ आहे, व म्हणून तेंच खरें साध्य आहे; हे तिसरें तत्त्व. मनुष्याचा आत्मा हा परमात्म्याचा अंश आहे. देहभिन्नतेमुळे प्रत्येक जीवात्मा निराळा भासतो, पण सर्व भूतांचे ठायीं अन्तरात्मा एक आहे व तो परमात्माच होय. वास्तविकपणें जीवात्मे निरनिराळे नाहींत. परमात्मा व जीवात्मा हे एकच आहेत; हें चवथें तत्त्व. परमात्म्याची प्राप्ती करून घेणें, आपल्याला मोक्ष मिळविणें, म्हणजे परमात्म्याचें आणि जीवात्म्याचें ऐक्य किंवा अद्वैत जाणणे होय. हें ऐक्य ज्याच्या अनुभवास आलें तो मुक्त झाला. हे ऐक्यभावाचें ज्ञान प्राप्त करून घेण्यास नवविधा भक्ति आणि गुरुभक्ति व गुरुसेवा ह्या गोष्टी आवश्यक आहेत. गुरूवांचून हे ज्ञान मिळावयाचेंच नाहीं; हे वेदांताचे पांचवें तत्त्व."

[प्रि. भाटे, थोडा फेरफार करून ]. आपल्या लोकांचा पुनर्जन्मावर पूर्ण विश्वास आहे. जन्ममृत्यूंचा फेरा थांबला म्हणजे मोक्ष झाला. जन्मोजन्मीं आशा अथवा तृष्णा राहात जाते म्हणून पुन्हा पुन्हा जन्म होतो. तो पूर्वसंचीत असेल त्याप्रमाणें भिन्न भिन्न योनींतही होतो. दुसऱ्या तत्त्वांत सांगितलेल्या दुःखाचें कारण पूर्वसंचित,—पूर्वजन्मीं केलेल्या कर्मांचा विपाक. हे संचित अथवा भोक्तृत्व भोगलेंच पाहिजे. परंतु ईश्वरभक्तीच्या योगाने आणि सत्कर्मांनीं या भोक्तृत्वाचा —पापांचा—नाश होतो. याप्रमाणे पापें जळतात, पण पापाचें मूळ जळत नाहीं. त्यासाठीं चवथ्या आणि पांचव्या तत्त्वाप्रमाणें गुरुकृपेनें आत्मज्ञान झालें पाहिजे. ज्ञान होण्यास मनुष्यजन्मच पाहिजे. तो मिळण्यास पुण्यमय पूर्वसंचित पाहिजे. मनुष्यजन्मींच आत्मज्ञान होईल. तें झालें म्हणजे पूर्वसंचिताचें बीजही जळून जातें. तृष्णेचा नाश होतो. आणि प्राणी मोक्षपदास जातो. हें आपल्या धर्माचें सहावें तत्त्व आहे.

हें आमचें वेदान्त मत. हें थोडक्यांत पाहिलें तर समजण्यास कठीण नाहीं. परंतु त्या वेळीं अद्वैतमताप्रमाणेंच दुसरीं अनेक वेदान्तमतें असल्यामुळें, आणि यांतच आणखी भक्तिमार्गाचा अंतर्भाव झाल्यामुळे, संतसाधूंत पुष्कळसे खरे ज्ञाते नसल्यामुळें, लोकांच्या अज्ञानामुळे, आणि गुरू व सांप्रदायी यांचे आपलें वर्चस्व राखावयाचे प्रयत्न चालत यामुळे प्राचीन संस्कृत अध्यात्मविद्येप्रमाणेंच ही मराठी अध्यात्मविद्याही लोकांना न कळेशी कठीण बनूं लागली होती. पुष्कळ साधुसंत विद्वत्तेंत तितपतच असत. पुष्कळांनीं हा धंदा केवळ योगक्षेम साधण्यासाठीं चालविलेला असे. यामुळें ही मते आणि तत्संबंधीं अपरंपार वाङ्मय यांचा पुष्कळ गोंधळ झालेला आहे.

आध्यात्मिक वाङ्मयाप्रमाणेंच पुढें आख्यानवाङ्मय सुरू होऊन शेंकडों आख्यानें लिहिली गेलीं. यांतलीं पुष्कळ सरासरीची कविता आहे. तथापि त्यांत कित्येक सुंदर रचनाही आहेत. त्यावेळीं कीर्तनाचा प्रचार पुष्कळ होता. यामुळें लोकरंजनासाठीं मूळच्या आख्यानांत बऱ्याच स्वकल्पित नव्या गोष्टी घुसडून दिल्या आहेत. संस्कृत नाटककारांनी मूळच्या कथा नाटक सुंदर होण्यासाठीं फिरविल्या आहेत अथवा त्यांत नवीन घातलें आहे, त्याप्रमाणें या आख्यानांतून वाईटबरें असें पुष्कळ नवीन घातलें आहे. कित्येक आख्यानें व गोष्टी अगदीं नवीनही कल्पिल्या आहेत.

पुढील निबंधांत या काळांतले प्रमुख आणि प्रख्यात कवी, ज्यांचे ग्रंथ विद्यार्थ्यांना भाषा आणि वाङ्मय यांचा अभ्यास करण्यास उपयोगी आहेत, आणि ज्यांचें वाचन लोकांत पुष्कळ चालतें, त्यांच्यावरच संक्षिप्त चर्चा केली आहे. सर्व वाङ्मयाची आणि तें बनविणारांची माहिती करून घ्यावयाची असल्यास रा० भावे यांचा 'मराठी सारस्वत' हा ग्रंथ पाहावा.

## ३. कवींचे काळ—

कवींचे काळ भरंवसालायक सांगितलेले नाहींत. बहुतेकांचे जन्म-मृत्यूंचे शक ठरविणें कठीणच असतें. कित्येकांनी आपल्या बऱ्याच ग्रंथांत आणि कित्येकांनीं आपल्या कांहीं ग्रंथांत शकांचे उल्लेख केले आहेत, त्यांवरून अनुमान बांधावयाचें. प्रख्यात लोक निरनिराळ्या काळीं झाले असले तरी त्यांचे संघ बनवावयाची आमची चाल प्राचीनच आहे. त्या चालीप्रमाणें कित्येक मराठी कवी व संत एकत्र आणले आहेत. तसेंच एकाद्या साधारण माणसानें कवित्व करून तें नामांकित कवीच्या नांवावर घुसडून देणें नेहमीच चालू असतें. पूर्वीच्या काळीं जेव्हां ग्रंथ किंवा लेख छापून होणें शक्य नव्हतें तेव्हां हें चालू होतेंच; परंतु आतांच्या छापखान्यांच्या युगांतही असा प्रकार चालतो. यामुळे ज्ञानदेव दोन, नामदेव दोन, वामन तीन, विठ्ठल कवी चार, असले प्रकार मानण्यापर्यंत मजल येते. तेव्हां तूर्त तरी कवींचे दिलेले काल अजमासाचेच आहेत असें समजावें.

## ४. मुक्तेश्वर—[इ. स. १५९९-१६४९]

प्रस्तुत काळांतला पहिला कवी मुक्तेश्वर होय. ज्ञानदेवापासून यावेळपर्यंत झालेल्या कवींनीं वेदान्त आणि परमार्थज्ञान ह्यांवर रचना केली. परंतु हें वाङ्मय लोकप्रिय होणारें नव्हे. लोकांना आख्यानरूपी वाङ्मय पाहिजे होतें. मुक्तेश्वर हा, प्रख्यात संतकवी एकनाथ याचा नातू (मुलीचा मुलगा) अशी आख्यायिका आहे. तो लहानपणीं मुका होता, किंवा नीट बोलत नसावा. त्याची आई त्याला एकनाथाकडे घेऊन गेली असतां एकनाथानें 'बाबा, का रे बोलत नाहींस?' असें विचारलें. तो म्हणाला, 'महाराज, आपण सर्व बोलून टाकले, आतां मी काय बोलूं?' तेव्हां नाथांनीं त्याला पौराणिक कथांवर कवित्व करण्यास सांगितलें. अशा प्रकारच्या दंतकथा खऱ्या नसल्या तरी त्यांचा

*

मोठा उपयोग असतो. त्यांवरून लोकमताचा ओघ दिसून येतो. लोकांना आतां कथामय वाङ्मय हवें आहे. हें लक्षांत आणून नाथांनीं मुक्तेश्वरास आख्यानें लिहावयास सांगितलें, असा याचा इत्यर्थ दिसतो. एकनाथांनी थोडीशी कथामय वाङ्मयास सुरवात केली होती. परंतु त्यामध्यें आध्यात्मिक विचार मिसळलेले होते. नामदेवांनीही कथा लिहिल्या होत्या, त्याही भक्ति-रसात्मक होत्या. निवळ कथानकें प्रथमतः मुक्तेश्वरानें लिहिण्यास सुरवात केली. मुक्तेश्वर हा मराठींतला उत्तम कवी आहे. मुक्तेश्वराच्या संबंधानें येथें जास्त पाल्हाळ करावयास नको. याच्याविषयीं 'मराठी भाषेची घटना' आणि भिडेकृत 'चरित्र' यांमध्यें विद्यार्थ्यांनी वाचावें.

**५. रे० थामस स्टिफन**—[ इ. स. १५४९-१६१९ ].

या वेळीं हा एक अपूर्व इंग्रजी कवी होऊन गेला. हा हिंदुस्थानांत आलेला पहिला इंग्रज होय. हा रोमन क्याथोलिक मताचा असून जेसुइट होता, यामुळें पोर्तुगीज लोकांबरोबर धर्मगुरु म्हणून इकडे आला. यानें 'ख्रिस्त पुराण' नांवाचें ओवीबद्ध विस्तृत मराठी काव्य लिहिलें आहे. हें १६१६ सालीं इकडेसच छापलें. हें रोमनलिपींत असल्यामुळें आणि प्रती दुर्मीळ असल्यानें आमच्या विद्यार्थ्यांना त्याचा अभ्यास करितां येणें अशक्य. तथापि हा चांगला ग्रंथ असल्यामुळें ह्याची माहिती मराठीचा अभ्यास करणारांना अवश्य असावी. या कवीविषयीं 'मराठी भाषेची घटना' पृ० २५२ ते २५६ आणि पृ० ३०५ ते ३०७ यांत वाचावें.

या कवीच्या संबंधाच्या एका गोष्टीविषयीं येथें थोडी चर्चा केली पाहिजे. हें काव्य स्टिफेन यानें कोणा मराठी शास्त्र्याकडून लिहवून त्यावर आपलें नांव घातलें असें कोणी लिहिलें आहे, हें म्हणणें केवळ मत्सराचें आणि दुराग्रहाचें आहे, असें म्हटलें पाहिजे. या काव्यांत ज्ञानदेव, एकनाथ यांच्या भाषेचें अनुकरण आहे. संस्कृत शब्द पुष्कळ आहेत. तेव्हां त्या कवींच्या ग्रंथांचा प्रस्तुत कवीनें चांगला अभ्यास केला होता, असें दिसून येतें. तसेच युरोपियन लोकांना संस्कृताचा अथवा एखाद्या देशभाषेचा अभ्यास करावयाचा असल्यास ते देशी पंडितांची चांगली मदत घेतात. युरोपियन पंडित संस्कृतादि प्राच्य विद्यांचा अभ्यास कसा आस्थेनें आणि शोधकबुद्धीनें करीत असतात, हें आपल्यास माहीत आहेच. ग्रंथाची एकंदर रचना पाश्चात्य

काव्यांच्या धर्तीवर फार व्यवस्थित आणि टापटिपीचीं आहे. हें काम आमच्या त्या वेळच्या एखाद्या शास्त्र्याला मुळींच करितां आलें नसतें. हें काव्य वाचतांना मिल्टन कवीच्या 'पाराडाईझ लॉस्ट' आणि 'पाराडाईझ री गेन्ड' या काव्यांची चांगली आठवण होते, तेव्हां हें काव्य या इंग्रज कवीनेंच लिहिलें, यांत शंका नाहीं.

६. रामदास—[इ. स. १६०८–१६८१].

हा ठोसर आडनांवाचा देशस्थ ब्राह्मण. यानें लहानपणापासूनच विरक्त होऊन ब्रह्मचर्यवृत्ति धारण केली. देशांत पुष्कळ प्रवास करून लोकस्थिती पाहिली, कित्येक गुरूंजवळ अभ्यास करून ब्रह्म-विद्येचें संपादन केलें आणि लोकांना परमार्थ आणि सदाचरण हीं लावण्यासाठीं उपदेशक बनला. हा स्वभावानें निस्पृह, निग्रही आणि राम व मारुती यांचा निस्सिमभक्त आणि पूर्ण विरागी होता. त्याचे अंगीं संस्कृत विद्वत्ता फारशी नव्हती, तरी व्यवहारज्ञान चांगलें होतें. त्याची भाषा अगदीं साधी, सरळ व बालबोध आहे. व्याकरण शुद्ध लिहिणें वगैरे टापटिपीची त्याला फारशी चाड नव्हती. त्यावेळीं सर्व महाराष्ट्रभर पंढरीच्या विठोबाचे आणि त्याच्या वारकरी भक्तिमार्गाचें प्राबल्य होतें. हा सार्वजनिक भक्तिमार्ग तत्कालीन लोकांच्या दृष्टीनें फार ओंवळा होता. यांत ब्राह्मण, शूद्र, अस्पृश्य, मुसलमान सर्व घेतलेले चालत. परमेश्वरानें सर्व भक्त हे बंधूच अशी समजूत असे. यामुळें भ्रष्टाकार होतो अशी समजूत होती. हा ओंवळेपणा काढून टाकण्यासाठीं रामदासानें ही सोवळी भक्ति स्थापिली. रामदासीपंथाचे अनुयायी केवळ ब्राह्मण अथवा वरच्या उच्च जातीचे असतात. शूद्रांना त्रयोदशाक्षरी राममंत्राचा उपदेश मिळत नाहीं. सांप्रदायिक चालीप्रमाणें ग्रंथरचना पाहिजे म्हणून यानें कवित्व केलें. दासबोध, रामायणाचे सुंदरकांड आणि युद्धकांड हे दोन भाग, मनाचे श्लोक, बरेच अभंग आणि कांहीं किरकोळ भजनी कविता ही याची रचना आहे. मनाची कविता आणि कांहीं अभंग यांत कवित्व आहे. भजनी कवितेंतही थोडाफार भक्तिरस आहे. दासबोध हा नीतिपर, व्यावहारिक उपदेशपर आणि अध्यात्मिक चर्चेचा ग्रंथ यांत कांहींच काव्य नाहीं. तो केवळ गद्यग्रंथच आहे. याचा शिष्यवर्ग मोठा असून त्यानें ठिकठिकाणीं अनेक मठ स्थापिले. याच्या पंथानें लोकशिक्षणाचें काम चांगलें

चालविलें होतें असें दिसून येतें. त्याच्या आणि त्याच्या कित्येक शिष्यांच्या उद्योगाचें शिवाजीच्या राज्यस्थापण्याच्या उद्योगास साह्य झालें असावें. याचा आणि शिवाजीचा संबंध आणि त्याचे ग्रंथरचनेचें काम यांच्या अभ्यासास साह्यभूत असा प्रि० भाटे यांचा 'सज्जनगड व समर्थ रामदास' हा उत्तम निबंध आहे.

**७. वामन**—[मरणाचा सन सुमारें १६७३; कोणाच्या मतें १६९५].

हा प्राचीन मराठीचा प्रतिभावान् कवि आहे. हा मोठा संस्कृत पंडित होता असें समजतात. परंतु त्याच्या मराठी भाषेवरून अथवा त्याच्या थोड्या संस्कृत काव्यांवरूनही या गोष्टीची प्रतीती पटत नाही. तो तुकारामाकडे गुरुपदेशासाठीं गेला होता आणि रामदासाचा शिष्य झाला होता या गोष्टी दंतकथांवारीच दिसतात. याचे म्हणून मोडणारे लहान मोठे पुष्कळ ग्रंथ आढळतात. पण भाषेवरून त्यांपैकीं बरेच त्याचे नांवावर घालून दिले आहेत असें दिसतें. वामन नांवाचे कवि तीन झाले, अशीही कोणी कल्पना करितात. आपण जो वामन पंडित म्हणून कवि मानितों त्याचे ग्रंथ रा. भिडे यांनी आपल्या प्रस्तावनेंत लिहिले आहेत तेच आहेत. भर्तृहरीच्या शतकांचीं भाषांतरें भाषेवरून वामनपंडितांचींच मानलीं पाहिजेत. त्याची भाषा प्रौढ व सरळ आहे, आणि तींत स्वभावोक्ती आणि ओजस्विता भरपूर असते. वीररसाची वर्णनें वाचतांना तो रस प्रत्यक्ष उभा राहतो. वनसुधा, वेणुसुधा, भामाविलास, रुक्मिणीविलास हीं प्रकरणें फार गोड आहेत. यानें श्लोकवृत्तांना झोकदार स्वरूप आणून दिलें आहे. वामन भाषेच्या शुद्धाशुद्धतेकडे फारसें पाहात नाहीं. त्याच्या वर्णनामध्यें पुनरुक्ती फार असतात. आणि मागला पुढला संदर्भ पुष्कळसा सुटतो. अध्यात्मिक प्रकरणें तर पाल्हाळिक व्याख्यानांनीं कंटाळवाणीं झालीं आहेत. हरिविलास या ग्रंथांत कालियामर्दनाची वीररसप्रधान कथा आहे. ती फार उत्तेजक आहे. पण तिच्या बरोबरच्या वेदान्त प्रतिपादनानें वाचक कंटाळतो. कित्येक कृष्णपर काव्यें फारच अश्लील शृंगारपर आहेत. ज्ञानदेवाचें गीतेवरील भाष्य भावार्थ-दीपिका आणि वामनाची यथार्थ-दीपिका यांची तुलना करूं लागल्यास, ज्ञानदेवाची जुनी भाषा आणि जुने शब्द यांची एकदां ओळख झाली म्हणजे त्याच्या साध्या उपमा, रूपकें, दृष्टान्त आणि

उत्प्रेक्षा यांच्या योगानें विषय मनांत भरून वाचकाचें मन तल्लीन होतें, आणि एकाद्या प्रेमळ गुरूची उपदेशपूर्ण प्रासादिक वाणी आपण ऐकत आहों असें वाटतें. ही मौज वामनाच्या ग्रंथांत नाही. उपमा, दृष्टान्त, बहुतेक नाहींतच. संस्कृत शब्दांचें प्राचुर्य आहे. विषय गहन आणि प्रतिपादनाचा विस्तार असल्यामुळे ग्रंथ कंटाळवाणाच झाला आहे. अशा प्रकारच्या आध्यात्मिक ग्रंथांतही अश्लील शृंगाराचे दृष्टांत आहेत. यथार्थ-दीपिका हे गीतेवरचें गद्यमय विस्तृत भाष्यच मानले पाहिजे. मूळ संस्कृत भाष्यामध्ये प्रतिपादनाचा प्रशांत ओघ जसा ज्ञानेश्वरीत चाललेला आहे, तसा यथार्थ दीपिकेंत नाही. वामन पंडिताच्या भाषेचे मुख्य गुण भाषेवरील त्याचे प्रभुत्व, त्याचा उत्साहीपणा आणि वर्णनांचा जोरदारपणा हे आहेत. वीररस, शृंगार, भक्ति इत्यादि कोणत्याही प्रकारचा विषय असला तरी त्याची वाणी उदात्त आणि मनावर ठसा उठवण्यासारखी असते. वामन कवीच्या काव्यांच्या आणि भाषेच्या जास्त माहितीसाठीं ‘ मराठी भाषेची घटना, व ‘ हंसकृत निबंध ’ हीं पुस्तकें, आणि भावे यांची प्रस्तावना वाचावी.

## ८. रघुनाथ पंडित.

याचा काळ अजून ठरला नाही. शिवाजीचा पिता शहाजी याच्या बरोबर तंजावर प्रांतांत गेलेल्या मंडळींतला हा कवी असून, त्याच्या वेळचाच असावा असें अनुमान करितात. याचें ‘ दमयन्तीस्वयंवराख्यान ’ हे काव्य आणि ‘ गजेंद्रमोक्ष ’ व ‘ रामदासस्तव ’ ही दोन लहान प्रकरणे प्रसिद्ध आहेत. यांतलें शेवटचें प्रकरण त्याचे नसावें. ‘ दमयंती स्वयंवर ’ किंवा ‘नलोपाख्यान’ हें मराठींतले सुंदर, गोड काव्य आहे. हे संस्कृत नैषध काव्याच्या आधारे रचिलें आहे. यांत नैषधांतले अलंकार आणि विचार व वर्णनें घेतलेली आहेत. यांत शब्दालंकार आणि अर्थालंकार यांची रेलचेल असून भाषा डौलदार, मनोहर, प्रौढ, गंभीर अशी आहे. मराठींत संस्कृत काव्य किंवा नाटक याच्या अनुकरणाने रचिलेलें हे एवढेंच एक काव्य आहे. त्यावेळच्या काव्यग्रंथांत याची निराळी ठेवण नेव्हांच दिसून येते. त्यांत आलेलीं उपवनांची आणि नगरांचीं वर्णनें यांवरून कवीची वर्णनशैली चांगली आहे असें दिसून येतें. पदलालित्य हा या काव्याचा मुख्य गुण आहे संस्कृत आणि मराठी शब्दांचा योग्य उपयोग केलेला आहे. भाषेत वृत्त

सुखासाठीं केलेली अशुद्धरचना बरीच आहे. ही शिवाजीच्या वेळची मराठी भाषा आख्यान-काव्यांस चांगली योग्य बनलेली दिसते. हा कवी कीर्तनकार होता, अथवा हें काव्य त्यानें कीर्तनाकरितां केलेलें दिसतें. यामुळें त्यांत साक्या, दिंड्या, पद्यें, चूर्णिका वगैरे कीर्तनोपयोगी काव्य पुष्कळ आहे. याला शृंगारिक वर्णनाची आवड फार होती; यामुळें याच्या काव्यांत अश्लील आणि असभ्य मानलेल्या शृंगाराचीं स्थळें पुष्कळ आहेत. तथापि असल्या कविता काढून जुळविलेलें संक्षिप्त नलाख्यान चालू नवनीतांत आहे, तें विद्यार्थ्यांनीं वाचण्यास योग्य झालें आहे. ह्या कवीचें काव्य महाराष्ट्रांत मागून आलेलें दिसतें. कारण मोरोपंतांच्या सन्मणिमालेत या कवीचा उल्लेख नाहीं.

**९. श्रीधर**—[सन १६७८–१७२९]

हा पौराणिक कथा रचणारा उत्तम मराठी कवी आहे. हा बारामती आणि पंढरपूर येथें राहात असे. याचे मुख्य ग्रंथ हरिविजय, रामविजय, पांडवप्रताप, जैमिनी अश्वमेध, शिवलीलामृत, पंढरी-महात्म्य हे आहेत. यानें आपल्या बहुतेक सर्व ग्रंथांत शक दिले आहेत. यानें मुक्तेश्वराच्या भाषेचें अनुकरण केलें आहे. तरी याचे ग्रंथ जास्त लोकप्रिय आहेत. याचें कारण हा थोडक्यामध्यें लहान लहान कथा सांगतो, त्या लोकांना लांब आख्यानापेक्षां अधिक आवडतात. याचे भाषेत शब्द सोपे, उपमा, रूपकें, दृष्टान्त वगैरे अगदीं साधीं आणि संक्षिप्त वर्णनेंही गोड भाषेमध्ये केलेलीं असतात. वर्णनाची आणि रस उत्पन्न करण्याची याची हातोटी चांगली आहे. याची भाषासरणी सुबोध, बरीच शुद्ध आणि विषयांची मांडणी गोड असते. कोणताही रस तो वाचकाच्या मनास भारून टाकील असा मूर्तिमंत उभा करितो. याचे ग्रंथ आबालवृद्ध स्त्रीपुरुष नेहमी वाचीत असतात. वाचतां न येणारे लोक याचे ग्रंथ वाचवून श्रवण करितात. याच्या वर्णनांत असभ्य शृंगार नसतो. आध्यात्मिक प्रतिपादन थोडेंच असून त्याचे पर्यवसान भक्तिरसांत असतें. ह्याचा हरिविजय हा ग्रंथ फार रसभरित आहे. तो त्याच्या सर्व ग्रंथांत उत्तम म्हणून मानला गेला आहे. मोरोपंत म्हणतो कीं, शिवदर्शनास गेलें असतां प्रथमतः जसें नंदीस वंदन करावे, तसें अगोदर हरिविजय ग्रंथाचा आदर करून मग श्रीधरास वंदावें. या ग्रंथांत भक्तिरस प्रधान असून गोपींचें कृष्णप्रेम सभ्य भाषेंत चांगलें वर्णिलें आहे, आणि कृष्णाच्या बाललीला

सविनोद वर्णिल्या आहेत. पांडवप्रतापांत वीररस मनोवेधक वर्णिला आहे. पांडवप्रतापाच्या तिसाव्या अध्यायांतील हरिश्चंद्राख्यान, त्यांतीलच अभिमन्यु-वध आणि स्त्रीपर्वातील स्त्रियांचा शोक, आणि शिवलीलामृतांतील श्रियाळ आख्यान हीं हृदयद्रावक आहेत. अभिमन्यूच्या पराक्रमाचें वीररसपूर्ण वर्णन वाचतां वाचतांच एकाएकीं त्याचा वध झाला, या वर्णनानें वाचकाचें मन शोकानें व्याप्त होतें. रामविजयांत नेहमाचें लोकप्रिय असें रामचरित्र प्रौढ, गंभीर आणि सरस भाषेत मनाला ठसेल असें वर्णिलें आहे. याचें ओवीवृत्त ज्ञानदेवासारखें अगदींच तुटकें किंवा एकनाथ-मुक्तेश्वरांसारखें बरेंच लांबटही नसून चार चरणीं समान असें आटोपसर असतें. यामुळें त्याचे चरण रसपूर्ण आणि अलंकारयुक्त लहान लहान वाक्यांस कोंदणासारखे शोभवितात. या सर्व गुणांमुळें महाराष्ट्रांतील स्त्रीपुरुष त्याची मधुर वाणी नेहमी चाखून संसारदुःखानें तापलेल्या मनाचें शांतवन करीत आले आहेत. हा संत कवी नव्हे. तथापि हा उतार वयात संन्यासी झाला होता

# २—मराठी गद्य-वाङ्मय

## सन १८२० ते १८७०

### १. प्रास्ताविक—

या पन्नास वर्षांत ग्रंथ फार थोडे झाले आहेत. तथापि या कालांत पाश्चात्य धर्तीवर आमची विद्याप्रसाराची शिस्त ठरली, आणि तशा प्रकारचा विद्याक्रम सुरू झाला. त्यामुळें आमच्या इकडे नव्हत्या अशा नवीन गोष्टी भाषेमध्यें उत्पन्न झाल्या, व देशामध्यें सर्व प्रकारचे नवीन विचार सुरू होऊन त्यांना योग्य असें विविधप्रकारचें वाङ्मय उत्पन्न होऊं लागलें. वर्तमानपत्रें आणि मासिक व त्रैमासिक पुस्तकें निघूं लागलीं, सभा भरूं लागून त्यांत व्याख्यानें आणि वादविवाद होऊं लागले आणि शाळांतून व कॉलेजांमधून नवीन तऱ्हेनें शिक्षण देण्याचा प्रघात सुरू झाला. यामुळें हा काळ फार महत्वाचा आहे. तेव्हां या काळांतील वाङमयाचा विद्यार्थ्यांचा अभ्यास आणि गुरूंचें अध्यापन हीं सुकर व्हावीं, यासाठीं या पन्नास वर्षांत वाङ्मयाच्या उन्नत्तीचे काय काय प्रयत्न झाले आणि भाषा व वाङ्मय ही कशीं घटत गेली, हे सामान्यतः थोडक्यांत सांगावयाचें आहे.

### २. ब्रिटिश अमलाच्या आरंभींची स्थिती—

या कालाचा आरंभ झाला तेव्हां आमच्या देशांत विद्याप्रसार, लोक-शिक्षण, सार्वजनिक विद्यालयें व शाळा, इत्यादि व्यवस्था नव्हत्या अर्थात् तशा प्रकारच्या अभ्यासाकरितां उत्पन्न झालेलें वाङ्मय हीं नव्हतें. संस्कृतांतलें ग्रंथ हीच विद्या, अशी समजूत होती आणि त्या दृष्टीनें संस्कृत ग्रंथांचें पठण चालू होतें, आणि ह्या विद्यांमध्यें विद्वान् लोक तयार होत होते. त्यांस निरनिराळ्या मार्गांनीं उत्तेजन ही मिळत होतें. ही संस्कृत विद्या जनतेच्या आटोक्यांत नाहीं, ती प्राकृतांत झाली पाहिजे, असें मनांत येऊन संस्कृत अध्यात्मविद्या, वेदान्त, पौराणिक आख्यानें वगैरे यांवर मराठींत ग्रंथ झाले होते. परंतु ते सर्व पद्यमय होते. शिवाय ते ग्रंथ केवळ एकाच म्हणजे धार्मिक आणि भक्तिमार्ग या विषयावर होते. छापखानें नसल्यामुळें त्यांचा

प्रसार हस्तलिखित पोथ्यांनीं आणि संतमंडळांच्या सांप्रदायाकडून काय तो होत होता. सांप्रत ज्याला उदार शिक्षण आणि लोकोपयुक्त शिक्षण म्हणतात, तशा प्रकारच्या शिक्षणाचा उपक्रम आमच्या इकडे संस्कृतांत म्हणण्यासारखा नव्हता आणि मराठींत मुळींच नव्हता.

या काळाच्या अगोदर दीडशें वर्षेपर्यंत मराठी भाषा बोलणारांनीं म्हणजे मराठ्यांनीं सर्व देशभर अनेक उलाढाली केल्या, आणि देशाचा बहुतेक भाग आपल्या सत्तेखालीं आणिला. या राजकारणाच्या कामीं त्यांनीं मराठी भाषेचा उपयोग केला, यामुळें तिला या वेळीं बरेंच चांगलें उन्नत स्वरूप आलें होतें. सवाई माधवरावाच्या मृत्यूपासून तों मराठी राज्य लयास जाईपर्यंतच्या काळांत अनेक राजकारणें झालीं. तीं करणारे पुरुष नानाफडणवीस, शिंदे, शिंद्याच्या दरबारीचे शेणवी मुत्सद्दी, परशुरामभाऊ पटवर्धन वगैरे आणि त्यांचे कारकून हे उत्तम लेखक होते. त्यांचीं परस्परांवर कडी करण्याचीं राजकारणें मराठींत चालत होतीं. या वेळचा पुष्कळ पत्रव्यवहार आतां उपलब्ध होऊन प्रसिद्ध झाला आहे, मुख्यतः पटवर्धनांच्या दप्तरांतील खरेशास्त्री यांनीं प्रसिद्ध केलेल्या लेखाचे भाग ९ आणि १० हे पाहिले असतां त्या वेळची मराठी भाषा चांगली प्रौढ आणि सर्व प्रकारच्या भाषासौष्ठवाच्या साधनांनीं पूर्ण असून राजकारणांचा ऊहापोह तींत करितां येण्यासारखी होती, असें दिसून येतें. या वेळचें मराठी गद्य म्हणजे दरबारी पत्रें, यादी, कैफीयती, स्वाऱ्यांचे वगैरे वृत्तांत, कित्येक बखरी, आज्ञापत्रें, वगैरे प्रकारचें आणि तेवढेंच कायतें होतें. पेशव्यांचें राज्य नष्ट झालें त्याच्या अगोदर थोडे वर्षांत लिहिलेल्या चिटनवीस यांच्या बखरी आणि त्यानंतर सुमारें ३० वर्षांनीं लिहिलेली पेशव्यांची बखर ह्या आतां प्रसिद्ध झाल्या आहेत. त्यांवरून मराठींत हकीगती लिहिण्याची पद्धत बरी होती असें दिसून येतें. इंग्लिशांनीं मराठी राज्य घेतलें, तेव्हां त्या राज्याखालचे संस्थानिक, जहागीरदार, इनामदार, सरदार वगैरे यांस खुष राखून त्यांची उत्पन्नें वगैरे त्यांस बहाल केलीं, आणि ते स्वस्थपणें आपापल्या स्थानीं जाऊन बसले. त्यावरोबर राजकारणें बंद होऊन, वाङ्मयही बंद पडलें, आणि हीं कागदपत्रें वगैरे यांचीं ठिकठिकाणीं दप्तरें बांधलीं जाऊन तीं दप्तरें जुन्या वाड्यांच्या तळघरांतून, कोठ्यांतून, खपरेलांतून, कोना-कोपऱ्यांतून

वगैरे मृतवत् होऊन पडलीं. यांतलें कांहीं वाङ्मय कीटकांचे भक्ष्यस्थानीं पडून नष्ट झालें; कांहीं वाण्याच्या दुकानीं कामीं आलें; आणि बाकीचें या पन्नास वर्षांच्या नंतर उघडकीस येऊन, आतां कोठें ते कित्येक उद्योगी आणि संशोधक मंडळींच्या प्रयत्नांनी पुढें येत आहे. सध्या जें वाङ्मय प्रसिद्ध होत आहे, त्यावरून तें फार विस्तृत असलें पाहिजे, अशीच भावना होत आहे, आणि ते उदयास आणण्याचे सक्त प्रयत्न चालू आहेत. परंतु सन १८२० सालीं जें काय विद्यमान होतें ते बहुतेक सर्व गद्यवाङ्मय तात्पुरतें नष्ट झालें होतें, असें म्हणण्यास चिंता नाहीं. तेव्हां या पन्नास वर्षांच्या इतिहासांत त्याचें नांव येणार नाहींच. यानंतर जें नवीन वाङ्मय उत्पन्न झालें, तो मराठी भाषेचा अगदीं नवाच अवतार झाला. त्या वेळीं जी मराठी भाषा तयार झाली होती ती केवळ बोलण्याच्या आणि घरगुती व्यवहारांत होती. त्याचप्रमाणें हरदास पुराणिक, आणि प्राकृत ग्रंथ यांतून ते जनतेस समजून देणारे यांची तीच भाषा होती. भाषा टिकण्यास किंवा तिच्या उन्नतीस साह्यभूत अशा छापखाने, वर्तमानपत्रें, सभा वगैरे गोष्टी नव्हत्याच. यामुळें पुढें दक्षिणेंत जी मराठी भाषा पुन्हा उदयास आली, ती अशा प्रकारच्या मृतप्राय झालेल्या खोडाला अंकूर फुटून अगदीं नवीन उत्पन्न झाली.

## ३. मुंबईंतील आरंभ—

याच वेळीं मराठी भाषेचा एक नवीन अंकूर दुसरीकडे उद्भवला. त्याचें वृत्त अगोदर सांगूं. मुंबईंत ब्रिटिश राजसत्ता फार वर्षांपासून होती. त्या प्रदेशास पेशव्यांकडून मिळविलेला गार्श्री प्रांत जोडला गेल्यावर एक बराच मोठा मराठी भाषेचा टापू बनला. येथें एक नवीनच मराठीचें वळण उत्पन्न झालें. एकुणीसाव्या शतकाच्या आरंभापर्यंत या मराठी भाषेच्या उन्नतीला फारसें कसलेंही साह्य नव्हतें. परंतु त्यानंतर मिशनरी लोकांच्या उद्योगानें मराठी टाईप तयार होऊन ख्रिस्तीधर्माचीं लहान लहान धर्म-पुस्तकें छापून झालीं. मिशनरींनी प्रथमतः मराठीसाठीं मोडी लिपी घेऊन तिचे टाईप तयार केले. त्यांनीं बंगाल्यामध्ये मोडी-इंग्रजी असा एक मराठी कोश छापला ( १८१० ). पुढें त्यांनीं बालबोध टाईपही बनविले. प्रथमारंभीं पुष्कळ मराठी पुस्तकें शिळेवरच छापीत असत. मुंबईचे मराठी वळण असें होतें कीं, वाक्यें फार लांब नसत. संस्कृत शब्द अगदीं थोडे

व्यवहारांतले तेवढेच. भाषा अगदीं गद्य, साधी, सोपी. अशा प्रकारचें हें मराठीचें अव्याज-मनोहर रूप होतें. त्यावेळच्या ग्रंथकारांमध्यें बाळशास्त्री जांभेकर, सदाशिव काशिनाथ छत्रे, हरि केशवजी, गोविंद नारायण माडगांवकार, रावसाहेब मंडलीक, दादोबा पांडुरंग हे मुख्य होते. याचवेळीं मुंबईत सर्व मराठी प्रांतासाठीं विद्याखातें स्थापित होऊन वाचन, व्याकरण, गणित, इतिहास, भूगोल यांवर आणि कांहीं शास्त्रीय विषयांवर शालोपयोगी पुस्तकें तयार झालीं. गंगाधरशास्त्री फडके आणि जांभेकर यांनीं प्रथम लहान व्याकरणें लिहिलीं आणि पुढें दादोबांनीं व्याकरणाची चांगली रचना केली. केवळ शालोपयोगी पुस्तकांखेरीज बालमित्र, इसापनीति, आणि शिवाय सामाजिक विषयांवर आणि नीतिपर अशीं अनेक लहान पुस्तकें झालीं. यांतील कांहीं भाषांतरें, कांहीं इंग्रजीच्या आधारें लिहिलेलीं आणि कांहीं अगदीं स्वतंत्र होतीं. या सर्वांची मुंबई वळणाची सदर मराठी भाषा होती. याचा नमुना पाहणें असल्यास निबंधमालेंतील 'भाषापद्धती' आणि 'भाषांतर' आणि 'विद्वत्त्व व कवित्व,' हे निबंध पहावे. मुंबईतल्या मंडळीनें जांभेकर यांच्या नेतृत्वाखालीं भाषेच्या उन्नतीचे अनेक प्रयत्न चालविले होते. ज्ञानप्रसारक म्हणून एक मराठी व्याख्यानांची नियमित भरणारी सभा होती. तेथें होणारीं व्याख्यानें छापून निघत. या मुंबईच्या मंडळीनें ज्ञानप्रसारक, ज्ञानदर्शन, दिग्दर्शन, चंद्रिका, इत्यादि मासिक पुस्तकें चालविलीं असून त्यांमध्यें इंग्रजी पुस्तकें वाचून त्यांवर लिहिलेले मराठी लेख येत. हें मुंबईचें भाषावळण पुष्कळ दिवस अबाधित चाललें होतें. त्याला संस्कृताचें वळण जोडण्याचा दादोबांनीं प्रयत्न केला. त्यांची केकावलीची टीका 'यशोदापांडुरंगी,' विशेषतः तिची प्रस्तावना, आणि व्याकरणाची प्रस्तावना, हीं या प्रयत्नाचीं उदाहरणें आहेत. दादोबांच्या अशा संस्कृतमय भाषेनें या मुंबईच्या वळणावर विशेषसें तेज पडलें नाहीं. या मुंबईच्या भाषापद्धतीनें लिहिलेले उत्तम ग्रंथ म्हणजे विनायक कोंडदेव ओक यांचीं पुस्तकें होत. हीं प्रस्तुत काळाच्या नंतरचीं आहेत.

## ४. पुण्यांतील आरंभ—

मुंबईत याप्रमाणें भाषा आणि वाङ्मय यांच्या वृद्धीनें काम चालू असतां पुण्यासही निराळा प्रयत्न सुरू झाला. पेशवे सरकार दरवर्षी विद्या-

वृद्धीसाठीं दक्षिणेचे रूपानें मोठी रक्कम खर्च करीत असे. ही वार्षिक रक्कम निराळी काढून त्याला द क्षि णा फं ड असें नांव दिलें, आणि हा शिक्षण-वृद्धीचा जुना उपक्रम इंग्रज सरकारानें नव्या स्वरूपांत चालू ठेवून पुण्यास विश्रामबाग वाड्यांत एक पाठशाळा स्थापित केली. शिवाय सर्व महाराष्ट्र-भर प्राथमिक शिक्षणाची चांगली सुरवात झालीच होती. या पाठशाळेंत प्रथमतः जुन्या पद्धतीनें संस्कृत पंडित तयार होऊं लागले. त्यांमध्यें कृष्णशास्त्री चिपळूणकर, कृष्णशास्त्री राजवाडे, श्रीकृष्णशास्त्री तळेकर, कृष्णशास्त्री भाटवडेकर, कृष्णशास्त्री गोडबोले आणि परशरामपंत गोडबोले हे प्रमुख असून त्यांचें मराठीच्या उन्नतीकडे विशेष लक्ष गेलें. हे गृहस्थ इंग्रजीही शिकले. याच वेळीं हिंदुस्थानांत जुनीच शिक्षणपद्धती सुरू ठेवावी अथवा पाश्चात्य तऱ्हेची उदार शिक्षणाची नवीन पद्धत चालू करावी याविषयीं वाटाघाट होऊन प्रख्यात इंग्रज ग्रंथकार आणि मुत्सद्दी लार्ड मेकाले यांच्या शिफारशीनें पाश्चात्य पद्धती सुरू करण्याचें ठरलें. ख्रिस्ती मिशनरींनीं ही नवीन तऱ्हा आपलीं विद्यालयें स्थापून अगोदरच सुरू केली होती. त्यांना वाटत होतें कीं हिंदूलोक नवीन विद्या शिकले म्हणजे ख्रिस्ती होऊं लागतील. पुण्याच्या वरील नवीन विद्वान मंडळीनें मराठी भाषेच्या उन्नतीचें काम हातीं घेऊन संस्कृत आणि इंग्रजी भाषांतून मराठींत ग्रंथ आणण्याची सुरवात केली. सर्व विद्या संस्कृतांत असाव्या, प्राकृत या केवळ घरगुती भाषा होत, त्यांत पंडितांनीं कांहीं एक वाङ्मयव्यवहार करूं नये, असें जुन्या पंडितांचें दृढ मत असतां हें शास्त्रीपंचक मराठींत ग्रंथरचना करूं लागलें, याचें आश्चर्य वाटतें. याचें कारण ते इंग्रजी शिकून त्यांची दृष्टी निराळी झाली होती हेंच होय. या मंडळीचें आरंभींचें भाषेचें वळण पेशवाईच्या अखेरीस जें महाराष्ट्रांत कायम झालें होतें तेंच होतें. त्याचीच वाढ त्यांनीं पुढें चालविली. या मंडळीनें प्रथमतः संस्कृतांतील सर्व नाटकांचीं मराठींत भाषांतरें केलीं. हीं चांगलीं झालीं आहेत. या मंडळींतले कृष्णशास्त्री चिपळूणकर यांनीं अनेक ग्रंथ लिहिले. हे त्यांचे ग्रंथ इंग्रजी आणि संस्कृत यांतून भाषांतरमय आहेत. तरी त्यांनीं मराठी भाषा लिहिण्याची उत्तम पद्धत सुरू केली, आणि अशा रीतीनें भाषेच्या उन्नतीचें उत्तम काम करून इतर मंडळीच्या साह्यानें वाङ्मयाचा पाया घातला. संस्कृत भाषेची कृष्णशास्त्री यांस

चांगली ओळख होतीच. शिवाय त्यांच्या विशाळ बुद्धीमुळें त्यांना इंग्रजी भाषेची चांगली ओळख झाली, आणि इंग्रजींतले भाषापद्धतीचे सर्व उत्तम प्रकार त्यांना मराठींत आणतां आले. मराठीतलें पुण्याचें वळण बनविण्याचें मुख्य श्रेय चिपळूणकरशास्त्री यांजकडे आहे; आणि ज्याला मराठी भाषेवर प्रभुत्व संपादन करणें असेल, त्यानें त्यांच्या ग्रंथाचें मुद्दाम परिशीलन करावें. शालापत्रक हें मराठी शिक्षकांस उपयोगी असें मासिक पुस्तक चिपळूणकर चालवीत. त्यांत त्यांनीं इंग्रजीच्या साह्यानें अनेक उत्कृष्ट मराठी निबंध लिहिले. मराठी व्याकरणावर त्यांनीं संशोधनात्मक आणि टीकारूप निबंध लिहिले. मराठी ग्रंथांस उत्तेजन देण्यासाठीं 'दक्षिणाप्राईझ कमेटी' सरकारानें स्थापित केली होती. तिचे चिटणीस आणि 'रिव्हायझर (पुस्तकें तपासणारे) चिपळूणकर होते. यामुळें नवीन होणारीं पुस्तकें त्यांच्या मार्मिक दृष्टीखालून जात. या सर्व प्रयत्नांनीं पुण्यास वाङ्मयवृद्धीचें काम चांगलें चालू होऊन तेथें निराळेंच भा षा व ळ ण तयार झालें.

पुण्याच्या पाठशाळेंत मोल्स्वर्थ आणि क्यांडी हे दोन उद्योगी, विद्वान इंग्रज गृहस्थ सरकारानें नेमले होते. त्यांनी मराठी भाषेचा आस्थापूर्वक अभ्यास केला होता आणि त्यांची मराठी भाषेच्या उन्नतीच्या कामीं चांगली सहानुभूती होती. क्यांडी यांनीं मराठी भाषेची प्राथमिक क्रमिक पुस्तकें तयार केलीं. हीं त्या वेळीं उद्योग करीत असलेल्या देशी विद्वानांच्या साह्यानेंच तयार केलीं असून त्यांतील धडे आपल्या इकडील गोष्टींना धरून होते. या कामीं त्यांचे मुख्य साह्यकारी भास्कर दामोदर पाळंदे हे होते. या क्रमिक पुस्तकांतून मागें रजपूत लोकांच्या गोष्टी, आणि आणखी कित्येक ऐतिहासिक प्रसंगांवर धडे होते. ते वाचकांचे अंतःकरणांत स्वाभिमान उत्पन्न करण्यास योग्य होते. असे धडे इंग्रज ग्रंथकारानें घातले असून आमच्यांतील कोणी तरी गृहस्थानें ते पुढें रद्द केले! हे धडे मुलांनी घरीं वाचावे आणि घरांतल्या वृद्धमाणसांनीं ऐकत बसून त्यांतील मजकुराचें सादर कौतुक करावें, अशा लहानपणींच्या वेळा आठवतात. मोल्स्वर्थ आणि क्यांडी यांचें मोठें काम म्हणजे त्यांनीं तयार केलेले तीन उत्तम कोश हें होय. मोल्स्वर्थ यांनी पांच सात विद्वान शास्त्री मदतीसाठीं घेऊन एक मोठा मराठी कोश तयार केला. हा कोश तयार करितांना सर्व मराठी शब्द जमवून त्यांची महाराष्ट्राच्या

निरनिराळ्या भागांत माहिती मिळवून शब्दांचीं रूपें आणि अर्थ यांची चांगली छाननी केली होती. या कोशाच्या आधारानें मोल्स्वर्थ यांनीं एक मराठी-इंग्रजी कोश आणि क्यांडी यांनी इंग्रजी-मराठी कोश असे तयार केले. या दोन्ही कोशांस जोडलेल्या इंग्रजी प्रस्तावना मराठीच्या घटनेचा इतिहास समजूं इच्छिणारांनीं अवश्य वाचाव्या.

## ५. दोन्ही वळणांची तुलना आणि एकीकरण—

याप्रमाणें मराठीला कोश आणि व्याकरण हीं प्राप्त झाल्यावर तिच्या वाङ्मयाच्या वृद्धीचा भक्कम पाया भरला गेला, असें म्हणण्यास चिंता नाहीं. या सर्व गोष्टी पहिल्या पंचवीस वर्षांत झाल्या. तेवढ्या काळांत एकंदर सर्व प्रांतांत व मुख्यतः मुंबई आणि पुणें यांमध्यें चांगलें दळणवळण सुरू झालें, आणि भाषावृद्धीचीं सहायकें छापखाने, वर्तमानपत्रें, शाळा वगैरे हीं बरींच तयार झालीं, यामुळें मुंबईचें आणि पुण्याचें हीं भाषेचीं दोन वळणें एकवटून मराठी भाषेचें नवीन स्वरूप बनलें. या वेळीं मराठी लिहिणारे मुंबईचे दादोबा पांडुरंग यांना पुण्याच्या वळणाची आवड होती, आणि पुण्याचे लोकहितवादी यांना मुंबईचें साधें वळण प्रिय होतें, यामुळें हे दोन ग्रंथकार दोन्ही वळणांचे सांधक दुवेच होते. तथापि पुढें अनेक कारणांनीं पुण्याचें वळण हेंच मुख्य होऊन बसलें.

इतका वेळपर्यंत जो इतिहास सांगितला त्यावरून या दोन्ही वळणांचें स्वरूप चांगलें लक्षांत येईलच. मुंबईच्या वळणाचें मूळ त्या प्रांतांतली साध्या गरीब व उद्योगी लोकांची प्राचीन भाषा हें होतें. त्याला पुढें इंग्रजी भाषेच्या पद्धतीची जोड मिळाली. तें बनविणारे गृहस्थ संस्कृत विद्वान नव्हते. इंग्रजी भाषा ही त्या वेळीं साध्या व्यवहारापुरतीच होती. अशा रीतीचें हें साधें कोंकणी वळण होतें. पुण्यांतलें वळण हें या काळाच्या आरंभीं जी भाषा दक्षिणेंत मराठ्यांच्या घरीं दारीं होती, तिच्यापासून उत्पन्न होऊन, तें प्रथमतः पुण्याच्या पंडितांच्या जोपासनेखालीं वाढत गेलें आणि त्याला संस्कृताचें साह्य मिळालें. त्या नंतर कृष्णशास्त्री चिपळूणकर वगैरे मंडळीच्या प्रयत्नांनीं त्याला इंग्रजीचेंही साह्य मिळालें. अशा प्रकारें या दोन्हीं वळणांच्या पायावर रचली गेलेली मराठी भाषा सुमारें १८५० पासून पुढें सरसावत चालली.

## ६. पाश्चात्य विद्याप्रसार

पाश्चात्य शिक्षणपद्धती हिंदुस्थानांत सुरू करण्याचें ठरल्यावर कलकत्ता, मद्रास आणि मुंबई येथे युनिव्हर्सिट्यांची स्थापना झाली. निरनिराळ्या भाषा, गणित, इतिहास, तत्वज्ञान, इंजिनियरिंग, कायदे, वैद्यक वगैरे सर्व लोकोपयोगी विद्यांचे शिक्षणास आरंभ करून विद्यार्थ्यांना ज्ञानप्राप्तीच्या आणि अनेक लोकोपयोगी उद्योगांच्या मार्गास लावावें, आणि त्यांच्या द्वारें देशांतील एकंदर जनतेमध्ये विद्याप्रसार करावा हा युनिव्हर्सिटीच्या शिक्षणाचा मूळ उद्देश असतो. देशांतील राज्यकारभारास उपयोगी पडण्यासाठीं शिक्षित लोक तयार करावे, असाही या कामी सरकारचा उद्देश सर्वत्र असतो व तसा इंग्रज सरकारचाही होता. युरोपांतून इकडे यावयाच्या विद्या आणि तद्विषयक ग्रंथ या गोष्टी आयत्या तयार होत्या, त्यांचें शिक्षण इकडे द्यावयाचें होतें. या कामास देशी भाषा योग्य नव्हत्या. यासाठी तें शिक्षण इंग्रजीतून देऊन, देशी भाषांचाही त्याबरोबर अभ्यास व्हावा आणि त्यांची उन्नती साधावी असा उद्देश होता. प्रथमारंभीं सर्व परीक्षांच्या विषयांत देशी भाषांचा समावेश होता. त्या वेळी तयार झालेली रानडे, मोडक, पाठक, भागवे, कुंटे, म. चि. आपटे वगैरे विद्वान मंडळी मराठी घेऊन बी. ए. झाली होती. युनिव्हर्सिटीचें शिक्षण घेऊन नवीन विद्वान तयार झाले, म्हणजे त्यांनी आपण शिकलेल्या विद्या स्वभाषेंत जनतेला शिकवाव्या, त्यासाठी त्यांनी स्वभाषेंत व्याख्यानें द्यावीं आणि ग्रंथ लिहावे, अशा हेतूनें व्यवस्था ठरविली होती. या कामासाठी प्रत्येक कॉलेजांतून उत्तम रीतीनें शिकून तयार झालेल्या कांहीं जणांस चांगलें वेतन देऊन त्यांनी हें काम करावें आणि त्या करितां दक्षिणाफंडांतून फेलोशिपस ठेवाव्या असे ठरविलें होतें. प्रत्येक कॉलेजामध्ये या फेलोनें नियमित विषयांवर स्वभाषेंत व्याख्यानें द्यावा आणि दरवर्षी एखादा तरी ग्रंथ लिहावा, आणि अशा रीतीनें आपण इंग्रजीतून शिकलेल्या विद्यांचा फायदा केवळ आपणच न घेतां तो आपल्या कमी शिकलेल्या देशबांधवांस स्वभाषेंत करून द्यावा, आणि अशा रीतीनें देशी भाषांची वृद्धी व्हावी आणि वाङ्मय तयार व्हावें, अशी योजना त्या वेळचे शाळाखात्याचे डायरेक्टर मि० हावर्ड यांनीं ठरविली होती. परंतु हा त्यांचा निश्चय पुढें न चालतां दक्षिणाफेलो

मंडळीच्या हातून देशीभाषांत विद्या-वृद्धी करण्याचें काम कधींच कांहीं झालें नाहीं, आणि हे फेलो म्हणजे कॉलेजांतील गुरूंना शिकविण्याचे कामांतले एक्झरसाईझ बुकें, निबंध आणि परीक्षेचे कागद तपासणारे 'चेले' बनविले गेले. तथापि युनिव्हर्सिटीचें शिक्षण सुरू झाल्यावर तयार झालेल्या नवीन सुशिक्षितांनीं भाषावृद्धीच्या कामांत कांहीं दिवस चांगलें लक्ष घातलें, आणि त्यांच्या पुढें हें काम करणाऱ्या मुंबईच्या आणि पुण्याच्या मंडळींचा कित्ता असल्यामुळें एकदर मराठी वाङ्मयाच्या उन्नतीस त्यांच्या उद्योगामुळें पुष्कळ साह्य झालें.

यानंतर लौकरच देशी भाषांची युनिव्हर्सिटीच्या अभ्यासक्रमांतून हकालपट्टी झाली. तेव्हां अर्थात मराठीचा अभ्यास आणि ग्रंथरचना यांना आळा बसला. या हकालपट्टीमुळें बहुतेक एकुणिसाव्या शतकाच्या अखेरपर्यंत नवीन तयार होणाऱ्या मंडळीनें मराठींत ग्रंथरचना करण्याचे संबंधानें फारसें नांवाजण्यासारखें काम केलें नाहीं. या मुदतींत कित्येक निवडक नवीन विद्वान मंडळींनीं मराठीच्या अभिवृद्धीचें काम चांगलें झटून केलें. परंतु हें काम प्रस्तूतच्या काळांत येत नाहीं.

## ७. निरनिराळ्या संस्थांचें कार्य—

या काळांत देशीभाषांच्या उन्नतीसाठीं युनिव्हर्सिटीनें अगदीं थोडें काम करूनही आपल्या कर्तव्यांतली मुख्य गोष्ट कशी आंगाबाहेर ढकलून दिली हें सांगितलें. देशीभाषांचे प्रख्यात अभिमानी डा० वुईलसन यांच्या स्मरणार्थ फंड जमला होता, आणि तो युनिव्हर्सिटीच्या स्वाधीन झाला. दरवर्षास त्याच्या व्याजांतून पारितोषिक मिळून भाषाव्युत्पत्तीवर व्याख्यानें होत असतात. यामध्यें मधून मधून कांहीं वर्षांनी मराठीवर पाळी येते. हीं व्याख्यानें देशी भाषांवर होतात, तरी तीं इंग्रजींत होतात. तीं ऐकावयास युनिव्हर्सिटी हॉलमधील खुर्च्या-बाकांच्या संख्येइतकेही श्रोते कधीं जमत नाहींत; आणि आजपर्यंत झालेल्या व्याख्यानांत प्रथमतः सर भांडारकर यांचीं आणि नंतर अलीकडे झालेलीं प्रि० पटवर्धन यांचीं एवढींच मराठीच्या दृष्टीनें महत्वाचीं आहेत.

दक्षिणाप्राईझ कमेटीनें या काळांत पुष्कळ मराठी पुस्तकांना मदत केली आणि कित्येक नवीन पुस्तकेंही तयार करविलीं. कृष्णशास्त्री गोडबोले

यांचें ' नवीन मराठी व्याकरण ' असेंच तयार झालें. दादोबांचें व्याकरण, गोडबोले यांचें व्याकरण आणि चिपळूणकरांचे निबंध, तशींच याच सुमारास झालेलीं भांडारकर यांचीं संस्कृत भाषेपासून झालेल्या देशी भाषांच्या उत्पत्ती-वरील व्याख्यानें यांचा पुढें मराठी व्याकरण-वाङ्मयाचा विस्तार होण्यास फार मोठा उपयोग झाला. पुण्याची पाठशाळा बरेच दिवस चालून तिच्याच मधून संस्कृत, मराठी आणि इंग्रजी या भाषा बरोबर शिकून बरेच विद्वान तयार झाले. पुढें तिच्यांतून डेक्कन कालेज, हायस्कूल आणि मराठी ट्रेनिंग कालेज या तीन संस्था निघाल्या. ह्यांतील अंतिम संस्थेनें मराठी भाषेच्या उन्नतीचें काम पुष्कळ केलें. त्या वेळीं सर्व महाराष्ट्रभर मोठ्या मोठ्या गांवांतून मराठी शाळा निघाल्या होत्या. तेथें या ट्रेनिंग कालेजमध्यें शिकलेले शिक्षक जाऊन त्यांनीं मराठी भाषेच्या प्राथमिक शिक्षणाचा पाया घातला. ट्रेनिंग कालेज आरंभीं अनुक्रमें केरूनाना छत्रे, कृष्णशास्त्री चिपळूणकर आणि नारायणभाई दांडेकर या स्वभाषाभिमानी गृहस्थांच्या नेतृत्वाखालीं होतें. तेव्हां त्यांच्या कामाची निराळी प्रशंसा करावयास नको. या वेळीं या संस्थेमधून शिकून तयार झालेले कित्येक शिक्षक ग्रंथकार आणि कर्ते निपजले. शंकर बाळकृष्ण दीक्षित हे यांतले प्रमुख ग्रंथकार होत, एवढें सांगितलें कीं पुरे.

या खेरिज मराठी भाषेच्या उन्नतीचे अनेक खाजगी आणि व्यक्तिशः प्रयत्न झाले. मुंबईस इंदुप्रकाश, नेटीव ओपीनियन, हिंदू रिफारमर, सुबोध-पत्रिका हीं पत्रें निघून त्यामध्यें विष्णुशास्त्री पंडित, मंडलीक, मोडक, भांडारकर, रानडे, परमानंद, हे लेख लिहीत. पुण्यास ज्ञानप्रकाश निघून त्यांत बाबा गोखले, कृष्णशास्त्री चिपळूणकर, विष्णु परशुराम रानडे, विष्णु मोरेश्वर भिडे इत्यादिकांचे मार्मिक लेख असत. या पन्नास वर्षांच्या अखेरीस ' लोककल्याणेच्छु ' नांवाचें एक चटकदार पत्र पुण्यास निघूं लागलें होतें. त्या वेळच्या मराठी पत्रांतले लेख हल्लींसारखे केवळ बातम्या देणारे अथवा स्वपक्षाभिमानानें लिहिलेले नसून त्यांतून सामाजिक आणि लोकोन्नतीच्या विषयांवर अनेक लेख येत असत, हें लक्षांत ठेविलें पाहिजे. पुण्यास शाला-पत्रक चांगलें चाललें होतें. याच वेळीं आपल्या प्रांतांत ख्रिस्ती धर्म-प्रसाराच्या कामाचा सुळसुळाट झाला होता आणि कित्येक नामांकित मंडळी ख्रिस्ती झालीही होती, शिवाय मुंबईचा ' सोहंसमाज ' आणि निरनिराळ्या

*

ठिकाणचे 'प्रार्थनासमाज' हे वास्तविक ख्रिस्ती होऊं पाहणाऱ्या लोकांना त्या मार्गांतून परतवण्यासाठीं स्थापिलेले असून, हे समाजच जाऊन ख्रिस्ती धर्माला मिळतील की काय ही चुकीची समजूत झाली होती. यासाठीं ख्रिस्ती लोकांबरोबर वाद करण्याकरितां पुण्यास चिपळूणकर यांनी 'विचार-लहरी' नांवाचें एक पत्रक कित्येक दिवस चालविलें, आणि त्यांतून ख्रिस्ती धर्माच्या खंडणाचें काम केलें. याच कामासाठीं मुंबईसही नागपूरचे हरी माधव पंडित यांच्या साह्यानें दंभहारक मासिक पुस्तक नुकतेंच सुरू झालें होतें. हें मासिक पुस्तक पुढें त्याच्या चावटपणासाठीं फार प्रसिद्धीस आलें ! ही दोन्ही त्यांच्या भाषेच्या संबंधानें प्रख्यात होतीं. याच वेळा 'विविधज्ञान-विस्तार' हें मासिक पुस्तक नाडकर्णी, गुंजीकर आणि पंडित यांच्या नेतृत्वाखालीं सुरू होऊन मराठी भाषेच्या उन्नतीचें काम करूं लागलें होतें.

## ८. देशस्थिती आणि लोकस्थिती—

वाङ्मयाचे देशस्थिती आणि लोकस्थितीं यांवर आणि लोकांच्या विचारांवर, वर्तनावर, आणि त्यायोगें लोकांची राजकीय, सामाजिक, धार्मिक आणि आर्थिक स्थिती यांत फेरबदल होण्यावर परिणाम होतात. तसेंच या गोष्टींचे वाङ्मयावर आणि तद्योगें वृद्धी पावणाऱ्या लोकशिक्षणावर परिणाम होतात. ही गोष्ट आपल्यास इंग्रजी ग्रंथ वाचून आणि इंग्रजी शिक्षण घेऊन समजली आहे. आमच्या देशांत या काळामध्यें असे परिणाम होण्याची साधनें जीं छापखाने, वर्तमानपत्रें, सभा, व्याख्यानें आणि इतर राजकीय व सामाजिक चळवळी या प्रथमतः मुळींच नव्हत्या, आणि पुढें अगदीं थोड्या सुरू झाल्या होत्या. यामुळें यासंबंधानें झालेले परिणाम फारसे दाखवितां येणार नाहीत. तथापि आतां हे परिणाम ही सर्व साधनें प्राप्त झाल्यामुळें होत चालले आहेत. आतां तर राजकीय परिस्थिती अगदीच बदलत चालली आहे. यासाठीं या काळांत लोकस्थिती होती कशी, आणि त्यांमध्यें सध्याच्या उद्योगांचीं आणि त्यांच्या परिणामांचीं बीजें सांपडतात कीं काय, हें थोडेसें पहाणें अप्रासंगिक होणार नाहीं. फार दिवस राजकीय घोटाळे माजून " इंग्रजांचें परकी राज्य झालेलें पुरवलें, पण हें असलें स्वराज्य नको " असें लोकांस वाटत होतें, तो परिणाम एकदांचा घडूनही आला. सर्वत्र शांतता झाली. इंग्रज राज्यकर्ते मोठे शहाणे, पराक्रमी आणि सर्व गोष्टींत आपणापेक्षा

श्रेष्ठ आहेत, असें मत ठरलें. दंगेधोपे मोडल्यामुळें लोकांना शेतीभाती आणि थोडे फार असलेले इतर उद्योगधंदे संथपणे करितां येऊन देशांत धान्यादि व इतर सामुग्रीची स्वस्ताई झाली. आगगाड्या, आगबोटी, रस्ते वगैरे चालू होऊन, देशांतले पदार्थ भराभर बाहेर जाऊन, देशांत महागाई झाली नव्हती. लोकांची संपत्तीही वाढून साधारणतः पुढारी लोक खाऊन पिऊन सुखी झाले होते. थोडी फार विद्या प्राप्त झाली आणि इंग्रजी भाषा येऊं लागली की चांगल्या अशाम्या मिळूं लागल्या. यामुळे इंग्रजी राज्य हे 'रामराज्य' झाल्यासारखेंच वाटत होतें, इंग्रज लोक आमच्या देशांत आम्हास उत्तम राज्यव्यवस्था देण्यासाठीच केवळ आले नसून, स्वतांचें हित साधण्याचा त्यांचा विचार असलाच पाहिजे, ही भावना त्या वेळीं फारशी नव्हती. तसेच दळणवळणाची आणि सर्व देशांतील लोकांचे विचार परस्परांस कळण्याची साधने नसल्यामुळे खरोखरी काय चाललें आहे, हें फारसें कोणास कळत नव्हते. अशा प्रकारच्या लोकस्थितींत नवीन मराठी वाङ्मयाचा पाया पडला.

इंग्रजी राज्य झाल्यावर ख्रिस्ती धर्माचा प्रसार करणाऱ्या लोकांना आशा उत्पन्न होऊन सुशिक्षित लोकांस ख्रिस्ती करण्याचे प्रयत्न सुरू झाले. महाराष्ट्रामध्ये पंढरपूरचा वारकरी पंथ, रामदास पंथ आणि इतर कित्येक भक्तिपंथ यांचें चांगलेंच प्राबल्य असल्यामुळे या कामांत आमच्या प्रांतामध्ये हिंदुस्थानांतील इतर प्रांतांसारखें यश आले नाही. त्यांतच छापखाने उत्पन्न झाल्यावर जुन्या संतकवींचे वाङ्मय लोकांना वाचावयास सुलभ झालें होतें. असें असूनही कित्येक लोक ख्रिस्तीधर्मी झाले. ही गोष्ट बंद करण्यासाठीं लेख लिहिणें सुरू झालें, प्रार्थनासमाजासारखे पंथ निघाले आणि त्यांचेही उपदेश, लेख आणि व्याख्यानें होऊं लागली. त्या वाङ्मयाचा लोकविचारांवर चांगलाच परिणाम झाला. या वेळीं प्रार्थनासमाज आणि ब्रह्मसमाज यांवर कांहीं पुस्तकें झालीं. गोविंद नारायण या प्रख्यात ग्रंथकारांनी नीती आणि सद्वर्तन यांवर कित्येक लहान पुस्तकें लिहिली. यांची अशा प्रकारचीं सुमारें पंचवीस पुस्तकें पाहण्यांत आहेत. विष्णुबुवा ब्रह्मचारी म्हणून जुन्या तऱ्हेचे गृहस्थ होते. त्यांनीं वेदोक्त-धर्मप्रकाश नामक ग्रंथ लिहिला. त्यांत त्यांनीं विधवाविवाह, स्त्रीशिक्षण वगैरे कित्येक नवीन सुधारणांना तरफदारी केली

आहे. हे गृहस्थ लोकस्थितीचा स्वतां स्वतंत्र विचार करणारे होते. यांनीं 'सुखदायक राज्यप्रकरणीं निबंध' म्हणून एक लहानसें पुस्तक लिहून त्यांत सर्वसाधारण लोकसत्ताक राज्यव्यवस्थेची तरफदारी केली आहे.

प्रस्तुत कालाच्या अखेरीस व्याख्यानें आणि लोकशिक्षणविषयक लेख सुरू झाले होते. पुण्यास एक वक्तृत्वोत्तेजक सभा म्हणून सुरू झाली होती. तिचा दर वर्षी ८।१० दिवस व्याख्यानसमारंभ होऊन राजकीय, सामाजिक आणि धार्मिक विषयांवर व्याख्यानें होत, आणि उत्तम बोलणारास पारितोषिकें मिळत. हा उद्योग छत्रे, चिपळूणकर, कुंटे, रानडे वगैरे मंडळीनें सुरू केला, आणि त्यामुळें चांगले लेखक आणि वक्ते उत्पन्न होऊं लागले.

इंग्रजी राज्य झाल्यावर कित्येक धर्मविषयक मानलेल्या परंतु जुलमाच्या आणि दुष्परिणामी गोष्टी कायद्यानें बंद करणें इष्ट आहे असें राज्यकर्त्यांना आणि देशांतील पुढाऱ्यांस वाटलें. सतीची बंदी आणि विधवाविवाहाच्या परवानगीचा कायदा, यामुळें सर्व देशांप्रमाणें आमच्याही प्रांतांत चळवळ झाली, पण तेव्हां साधनांच्या अभावामुळें जनतेवर परिणाम होण्याजोगें फारसें वाङ्मय निपजल्याचें दिसत नाहीं. तथापि त्या वेळीं या सुधारणेच्या संबंधानें लोकांत चर्चा, व्याख्यानें, वाद वगैरे होत असावे. रे० बाबा पदमनजी या मराठी लेखकांनीं 'यमुनापर्यटन' नांवाचें एक पुस्तक सुमारे १८५६ सालीं लिहिलें आहे. हें कादंबरीच्या धर्तीवर लिहिलेलें कल्पित कथानक आहे. तरी यांतला विषय त्या वेळीं लोकांत खरोखरी चाललेल्या सामाजिक सुधारणेच्या चर्चेसंबंधीं आहे. तेव्हां हें 'आजकालच्या गोष्टीं'च्या धर्तीवर आहे. यांत विधवाविवाहाच्या बंदीमुळें विधवांची कशी वाईट स्थिती आहे, आणि त्यायोगें समाजांत भयंकर अनाचार होऊन समाज कसा बिघडला आहे, हें वर्णिलें आहे. त्यांत सभा, व्याख्यानें, वादविवाद, यांचा उल्लेख आहे. एवढ्या मोठ्या धार्मिक उलाढालीच्या चर्चेंत नवीन वाङ्मय उत्पन्न झालेंच पाहिजे. 'यमुनापर्यटन' हें मुंबईच्या साध्या, सरळ वळणांत लिहिलेलें चांगलें पुस्तक आहे. भाषा अगदीं घरगुती आहे. विषयप्रतिपादन शांतपणें पण वाचकाच्या मनांत ठसेल असें जोरानें केलें आहे. पर्यवसान ख्रिस्ती धर्मावर आहे. बाबा पदमनजी यांनीं आणखीही पुष्कळ लेख लिहिले आहेत. विधवाविवाहाचा कायदा झाल्यानंतर आमच्या इकडे विष्णुशास्त्री पंडित,

मुंबईचा इंदुप्रकाश आणि पुण्याचा ज्ञानप्रकाश, आणि यांची सहायक मंडळी यांनीं मोठाच लेखनप्रयत्न सुरू केला. यासंबंधाच्या वाटाघाटी या काळाच्या शेवटच्या पांच सहा वर्षांत चालू होत्या. प्रथमतः एक धार्मिक वाद पुण्यास झाला. कित्येक पुस्तकें प्रसिद्ध झालीं आणि लेख लिहिले गेले, व्याख्यानें होऊं लागलीं. या सर्व वाङ्मयाचा लोकांच्या विचारांवर फार मोठा परिणाम झाला. पुढें १८६९ सालीं पहिला विधवाविवाह होऊन वादविवाद, व्याख्यानें आणि लेख यांना फारच जोर चढला. पुण्यास शंकराचार्यांपुढें एक मोठा वाद झाला. तो मराठींत झाला. दोन्ही पक्षांस नवे जुने चांगले विद्वान पंडित होते, यामुळें या विषयांवर चांगलेंच मराठी वाङ्मय तयार झालें. परंतु हें वाङ्मय अजून कोणी एकत्र करून भाषेंत कायमचें राहील अशी तजवीज केलेली नाहीं. तसें करण्याची फार जरूर आहे.

## ९. या काळांतील ग्रंथसंग्रह—

या काळांतील मुख्य लेखक आणि त्यांचे कांहीं ग्रंथ यांचा उल्लेख प्रसंगानुसार मागें केलाच आहे. आतां मुख्य मुख्य ग्रंथांची थोडक्यांत माहिती सांगतों. यासंबंधानें प्रथमतः सांगितलें पाहिजे कीं यांतले पुष्कळ ग्रंथ आतां दुर्मीळ झाले आहेत किंवा उपलब्धही नाहींत. त्यांची माहिती केवळ आठवणीवरून आणि कांहीं ग्रंथ कोठे एखादवेळ पाहाण्यास मिळाले तेवढया-वरून सांगावयाची आहे.

आरंभींच्या सुमारें तीस वर्षांत महत्वाचे असे फारसे ग्रंथ झाले नाहीत. शालोपयोगी असे गणित, भूगोल, इतिहास, या विषयांवर लहान पुस्तकें झालीं. त्यांपैकीं मुख्यतः इसाबनीती, बालमित्र आणि जांभेकरांचा इतिहास हीं पुस्तकें उत्तम् भाषापद्धतीचे नमुने आहेत. कित्येक देशी आणि इंग्रजी वैद्यकांवर तशींच कायद्यांवर आणि हिंदू धर्मशास्त्र्यावर पुस्तकें झालीं. यांतील विशेषतः गणितावरील पुस्तकें युरोपियन पंडितांनीं लिहिलीं हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे.

गोविंद नारायण यांचें मुंबईचें वर्णन मागें लोकप्रिय होतें. हें सुंदर मनोरंजक भाषेंत लिहिलेलें असून त्यांत मुंबईचा जुना इतिहास, शहर कसें वाढत गेलें त्याची हकीगत आणि त्यावेळची स्थिती यांचें चांगलें वर्णन आहे.

याच सुमारास करसनदास मुळजी हे इंग्लंडास गेले होते. त्यांच्या प्रवासाच्या हकीगतीचें चांगले माहितीने पूर्ण असे लिहिलेले बरेंच मोठे पुस्तक तेव्हां प्रसिद्ध झालें होतें. त्यांत युरोपांतील शहरांची, इमारतींची वगैरे चित्रेंही होती. तिकडली आमच्या प्रवाशानें लिहिलेली ही पहिलीच हकीगत तेव्हां प्रसिद्ध झाली होती. महत्वाचे आणि चांगले ग्रंथ शेवटच्या वीस वर्षांत झाले. कोश आणि व्याकरणे यांचा उल्लेख मागें केलाच आहे. पुण्याच्या शास्त्री मंडळींचीं संस्कृत नाटकांची भाषांतरें हीं गद्यपद्यात्मक आहेत. वास्तविक हीं भाषांतरें नसून मुळाचें स्वरूप बहुतेक कायम ठेवून रचलेलीं रूपांतरें आहेत. त्यांत मालतीमाधव उत्तम असून वेणीसंहार, उत्तरराम, शाकुन्तल असा अनुक्रम लागेल. वेणीसंहार हे मुळांतलें मध्यम प्रतीचे नाटक आहे, या नाटकाचा मुख्य गुण पात्रांच्या स्वभावाप्रमाणे त्यांचे बोलणे आणि वर्तन दाखविणें हा आहे. हा गुण मूळ महाभारतांतून त्यांत प्रतिबिंबित झाला आहे. हा प्रकार दुसऱ्या उत्तम संस्कृत नाटकांतही नितका नाहीं. संस्कृत कवी आपल्या काव्य नाटकांत रसपरिपोष आणि अलंकाररचना करण्याकडे जास्त लक्ष पुरवितात. पात्रांच्या स्वभावविकासाकडे त्यांचें तितकें लक्ष नसते. हा गुण वेणीसंहाराचे खालोखाल भवभूतीच्या नाटकांत मात्र आहे. हीं भाषांतरें आतां दुर्मीळ झालीं आहेत. मालतीमाधव आणि मुद्राराक्षस यांच्या मात्र पुनरावृत्त्या निघाल्या आहेत. हीं लिहिलीं त्या वेळीं मूळ संस्कृत पुस्तकें केवळ आपल्या प्रांतांतलींच घेतलीं होतीं. आतां सर्व प्रांतांतल्या प्रती उपलब्ध झाल्या आहेत. आणि या नाटकांवर चर्चात्मक ऊहापोहही झाला आहे. तेव्हां यांच्या आतां नवीन आवृत्त्या निघणें इष्ट आहे.

या काळांतले मुख्य ग्रंथकार कृष्णशास्त्री चिपळूणकर होत. यांचा सर्व ग्रंथसंभार इंग्रजी आणि संस्कृत यांतून भाषांतररूपानें आला आहे. त्यांची भाषांतर करण्याची शैली फार उत्तम होती. मूळ पुढें ठेऊन त्यांतला मतलब पूर्णपणें मराठींत उतरून द्यावा अशी त्यांची शिस्त होती. आरबी गोष्टी, साक्रेटिसाचें चरित्र ( हे रोलिन्सच्या इतिहासांतील एका भागाचे भाषांतर आहे ), रासेलस आणि अनेकविद्यामूलतत्त्वसंग्रह व शालापत्रक यांतील अनेक लेख, ही इंग्रजी वरून, आणि साकीबद्ध मेघदूत आणि आणखी थोड्या कविता ही भाषांतरें संस्कृतावरून त्यांनी केली आहेत. हीं भाषांतरें

आहेत असें कोणास वाटणारही नाहीं, अशी त्यांची मराठी भाषा आहे. इंग्रजी आणि संस्कृत यांचा कित्ता पुढें ठेवून उत्तम मराठी भाषा कशी लिहावी हें शास्त्रीबोवांनीं दाखवून दिलें. ही शास्त्रीबोवांची भाषाशैली त्यांचे सर्व ग्रंथ उपलब्ध असल्यामुळें पाहावयास सांपडेलच. थोडासाच मासला पाहणें असल्यास निबंध-मालेंतील 'भाषापद्धति' या निबंधांतील उतारे पहावे.

संस्कृत नाटकांची भाषांतरें दक्षिणाप्राईझ कमेटीच्या आश्रयानें झालीं. त्या कमेटीचे शास्त्रीबुवा हे चिटणीस होते. यामुळे ती नाटकें चांगली तयार होण्यामध्यें त्यांचे प्रयत्न पुष्कळ झाले आहेत. शास्त्रीबुवांनीं अर्थशास्त्रावर एक मराठी ग्रंथ लिहिला आहे. या गोष्टीचा बराच चमत्कार वाटेल.

याच काळांत विनायक जनार्दन कीर्तने यांनीं 'जयपाळ' आणि 'थोरले माधवराव पेशवे' अशीं दोन नाटकें लिहिलीं. कीर्तने हे युनिव्हर-सिटींतून अगदीं आरंभीं शिकून तयार झालेले होते. हीं नाटकें लहानच आहेत. पहिल्याची कथा काल्पनिक आहे; कथानक थोडक्यांत सुंदर कल्पिलें असून बोधपर आहे. भाषा प्रौढ आणि गंभीर आहे. यांतले कांहीं उतारे 'भाषापद्धती' या निबंधांत सांपडतील. दुसऱ्याचें कथानक मराठी इति-हासांतले उघडच आहे. याचीही भाषा चांगली असून त्या वेळच्या सर्व पात्रांच्या स्वभावाचा उठाव चांगला केला आहे. हीं दोन्ही नाटकें तेव्हां-पासून आतांपर्यंत उत्तम म्हणून गाजत आहेत. आतां तीं दुर्मीळ झाली आहेत. या नाटकांची रचना पाश्चात्य नाटकपद्धतीच्या धरतीवर आहे.

या काळाच्या अखेरीस राजेकर यांनें 'मनोरमा' नामक नाटक इंदुप्रकाशांत भागशः प्रसिद्ध झालें. हें सामाजिक नाटक आहे. यांत विधवांची स्थिती आणि तिचे दुष्परिणाम, यांचें वर्णन असून आपल्या विवाहांतील कित्येक चालींचें विनोदपर विडंबन आहे. भाषा सुंदर, चटकदार आणि मौजेची असून तें त्या वेळीं लोकप्रिय झालें होतें. तथापि त्यांत अश्लीलपणा फार आहे अशा त्याच्यावर कडक टीकाही झाल्या. यांत जो अश्लीलपणा होता तो आपल्यांत चालू असलेल्या केशवपन वगैरे चालीविषयींच होता. मनुष्यास अश्लीलपणा करावयास खंती वाटत नाहीं पण त्या गोष्टीचें आविष्करण खपत नाहीं.

ग्रँट डफ यांचा मराठ्यांचा इतिहास आणि म्याकडोनल्ड

यांचें नाना फडनविसांचें चरित्र यांचीं भाषांतरें या काळांत झालीं आहेत. हीं भाषांतरें चांगलीं आहेत. त्यांवर कर्त्यांचीं नांवें नाहींत. याच काळांत लिहिलेलें आणखी एक नाना फडनविसांचें चरित्र आढळतें. तें मूळ लिहिलेलें असावें. ग्रांट डफ यांच्या इतिहासांत आतां आपणास चुक्या दिसत असल्या तरी तो इतिहास जेव्हां झाला, तेव्हांच्या कालमानानें त्याचें महत्व फार आहे. ग्रांट डफ याचा इंग्रजी ग्रंथ झाल्यावर त्याचें लगेच भाषांतर झालें. आपल्या लोकांना आपल्या इतिहासाची समग्र संगतवार अशी माहिती प्रथमतः याच बखरीवरून झाली. ही बखर मोडींत शिळेवर छापलेली मराठी शाळांतून असे. ती लहानपणीं वाचलेली आठवते. आमचे या संबंधाचें वाङ्मय सुप्त स्थितींत राहिल्यामुळें ग्रांट डफ यांचा हा ग्रंथ न होता, तर महाराष्ट्राचें मोठेंच नुकसान झालें असतें. प्रख्यात इतिहास संशोधक रा. ब. साने हे या ग्रंथासंबंधानें पेशव्यांच्या बखरीच्या उपोद्घातांत म्हणतात. " आमची अशी शिफारस आहे कीं, प्रत्येक ' महाराष्ट्रीय जन ' म्हणविणारानें–किंबहुना प्रत्येक हिंदू म्हणविणारानें–या इतिहासाची प्रत आपल्या संग्रहीं ठेवावी. निदान एक वार ती कोठें मिळवून वाचण्याची तरी तसदी घ्यावी. असें केल्यानें आमचे लोक म्हणजे गचाळ, वेडे, पौरुषहीन, अकल्पक असे जे आम्हांपैकीं पुष्कळांचे ग्रह झालेले आहेत, ते जाऊन आपल्या लोकांच्या पराक्रमांविषयीं, चातुर्याविषयीं, वगैरे तथ्य कळून योग्य अभिमान जागृत होईल." हा उतारा म्हणजे या ग्रंथाचें थोडक्यांत योग्य परीक्षण आहे. मंडलीक यांनीं एलफिन्स्टनच्या इतिहासाचें भाषांतर केलें. हें भाषेच्या संबंधानें अगदीं सामान्य आहे. विष्णुशास्त्री पंडित यांनीं मरेकृत इतिहासाचें भाषांतर केलें. गणेशशास्त्री लेले यांचें क्यापटन कूकचें चरित्र आणि महादेवशास्त्री कोल्हटकर यांचें कोलंबसाचें चरित्र आणि कानविंदे यांचें बर्थोल्डचें चरित्र हीं भाषांतरें चांगलीं आहेत. भास्कर हरी भागवत यांचें राममोहन राय यांचें चरित्र हें भाषांतर नसावें. विष्णु मोरेश्वर भिडे यांनीं सायरसचें चरित्र लिहिलें आहे. जनार्दन रामचंद्र यांच्या कविचरित्रांत पुष्कळ संस्कृत, मराठी, तामील आणि तेलगू कवी आणि ग्रंथकार यांची माहिती आहे. मात्र ती त्या वेळीं लोकांत प्रचलित असलेल्या आख्यायिकांवर रचलेली आहे.

बरींच स्वतंत्रपणें लिहिलेलीं अशी इतिहासविषयक कित्येक पुस्तकें झालीं. इंग्लंडच्या इतिहासावर दोन पुस्तकें असून त्यांतलें एक हरी केशवजी यांनी लिहिलें आहे. शिवाय बंडाचा इतिहास, कोल्हापूर संस्थानचा इतिहास, इजिप्तचा इतिहास आणि रशियाची राणी क्याथेराईन हिच्या कारकीर्दीचा इतिहास अशी पुस्तकें आढळतात. या बंडांच्या इतिहासाच्या शेवटीं बंड-वाल्यांची अखेरीस कशी त्रेधा उडाली, याचें अनुप्रासयुक्त गमतीचें वर्णन आहे.

या काळामध्यें कादंबऱ्या अथवा कल्पित गोष्टी यांनाही आरंभ झाला. संस्कृतांत कल्पित गोष्टी असत, परंतु त्या हल्लीं पाश्चात्य कादंबऱ्या आपणास माहित झाल्या आहेत, तशा नव्हत्या. मराठी कादंबऱ्या या नवीन तऱ्हेवर सुरू झाल्या. इंग्लंड वगैरे देशांत कादंबरी अगदी पूर्णत्वास आली आहे; आणि त्या वाङ्मयाच्या द्वारें लोकशिक्षणाचें काम चालू आहे.

आमच्याकडे अद्यापकालापर्यंत तिकडल्या कादंबरीतली ही तऱ्हा अगदी अल्प आली आहे. दोन स्त्रीपुरुषें आणि त्यांची परस्परांवर प्रीति कल्पावी नंतर त्यांवर संकट आलें, दुष्टांनीं त्यांचा छळ केला, त्या छळाला नायक आणि विशेषतः नाईका उत्तम रीतीनें सत्वाला टिकली, आणि सरते शेवटीं सर्व सुरळीत झालें, ही आमच्या कादंबऱ्यांतून गोष्ट असते. जगांतील लोकांच्या उलाढाली, पात्रांचा स्वभाव वगैरे दाखविणें आणि एखादें नीतितत्व काढणें हे फार थोडें असतें. वर्णन केलेल्या गोष्टी पुष्कळशा अति-शयोक्तीनें वर्णिलेल्या असतात. आमच्या नाटकांत शोकान्ताचा निषेध आहे. शोकान्त कादंबऱ्याही आमचेकडे होत नाहीत. आरंभीच्या कादंबऱ्यांत अद्भुत आणि असंभाव्य गोष्टीही फार असत. या काळांतल्या मुख्य कादंबऱ्या मुक्तमाला, मंजुघोषा, रत्नप्रभा, विचित्रपुरी, मोचनगड या होत. मुक्तमाला आणि मोचनगड या संभाव्य गोष्टींवरच आहेत. मुक्तमालेसाठीं अमुक एक काळ घेतला होता, अथवा तींत अमुकएक लोकस्थितीचें वर्णन आहे असें नाहीं आपली सामान्य लोकस्थिती घेतली आहे. मुक्तमाला आणि मोचनगड यांची भाषा मुंबईच्या वळणाची साधी असून चांगली आहे. दोहींतील सृष्टिविषयक वर्णनें बरीं साधलीं आहेत. मुक्तमालेचें पतिप्रेम व पतीकरितां आणि स्वतांच्या अब्रूच्या-बचावासाठीं तिनें सोसलेलीं

दुःखें हृदयद्रावक वर्णिलीं आहेत. तथापि तिला पेटींत पुरून ठेविल्याची गोष्ट असंभाव्य भासते. धनंजयाची स्वामीभक्ती उत्तम दाखविली आहे. भद्राक्षासारख्या दुष्टाचें चित्र चांगलें रेखलें आहे. शुक्राक्षाचा कृतघ्नपणा आणि सोमदत्ताची कृतज्ञता व त्याचें आपल्या मानलेल्या भगिनीसाठीं दुःख सोसणें यांचें वर्णन यथार्थ आहे. मोचनगड ही ऐतिहासिक गोष्ट कल्पिली असून तींत तेव्हांची लोकस्थिति चांगली वर्णिली आहे. त्यांतील गंगूवरील आलेली संकटें असंभाव्य आहेत. आमच्या सर्वच कादंबऱ्यांतील दुःखांचे प्रसंग आणि संकटें यांचें वर्णन असंभाव्य असतें. पुष्कळ वेळा मनुष्यें अशा संकटांस पुरी पडणें अशक्य आहे, असें वाटतें. या दोन कादंबऱ्यांचे लेखक हळबांकर व गुंजीकर हे उत्तम मराठी लिहिणारे होते. त्यांच्या नमुन्यावर पुढें अनेक कादंबऱ्या झाल्या आहेत. मंजुघोषा ही सर्व गोष्ट अद्भुत आणि असंभाव्य आहे. कालाचा मेळ नाहीं. नायक अमरावतींत वर्तमानपत्रे वाचीत बसतो ! विमानाची कल्पना अनुचित आहे. ही पंचतंत्रांतील एका गोष्टीवरून सुचलेली दिसते. मंजुघोषेचा बाप तिच्या आईवर रागावून बोलत असतां बोलण्यांत पुष्कळसे अनुप्रास आणितो ! विचित्रपुरीमध्यें भुतांखेतांच्या कल्पनेवर टीका आहे. तींतील चार पुरुष-नायक कलकत्ता युनिव्हरसिटीचे एम. ए. कल्पिले आहेत, परंतु एकंदर गोष्ट अगदीं जुन्या समजुतींच्या काळची आहे. रत्नप्रभेंत विधवाविवाह मान्य दाखविला असून तो घडविला आहे. विधवांचीं दुःखें यांत वर्णिलीं आहेत; परंतु नायकाची आपल्या पहिल्या स्त्रीवर इतकी प्रीति असून केवळ विधवेशीं लग्न करावयाचें, या बुद्धीनें त्यानें रत्नप्रभेशीं लग्न केलें आहे, हें योग्य वाटत नाहीं. या काळांतल्या रे० बाबा पदमनजी यांच्या 'यमुनापर्यटण' या कादंबरीचें वर्णन मागें आलेंच आहे. आरेबियन नाईट मधील गोष्टी या लहान लहान कादंबऱ्याच आहेत. त्यांत अद्भुत, असंभाव्य गोष्टी व वर्णनें पुष्कळच आहेत. या गोष्टी सर्व देशांप्रमाणें आपल्या इकडेही लोकप्रिय झालेल्या आहेत, आणि त्यांचें चिपळूणकरकृत भाषांतर हा ग्रंथ भाषेच्या संबंधानें मराठी भाषेची एक जोडच आहे. उत्तम भाषा लिहिण्याचें शिकणारांना जे मराठी भाषेचे नमुने आहेत, त्यांतला हा ग्रंथ प्रमुख नमुना आहे. मोरोबा कान्होबा यांची घाशीराम कोतवाल ही गोष्ट त्या काळची लोकस्थिती आणि तत्कालीन पुरुष यांची

निर्भत्सना करण्याचे हेतूनें लिहिली आहे. ती फार विनोदपर आहे. ती गोष्ट आणि तिच्यावर त्या वेळीं झालेल्या खरमरीत टीका वाचनीय आहेत.

महादेवशास्त्री कोल्हटकर यांनी शेक्सपियर याच्या 'अथेल्लो' या नाटकाचें भाषांतर केलें. इंग्रजींतून मराठींत नाटकें आणि कादंबऱ्या यांचें भाषांतर करण्याचे दोन प्रकार चालू आहेत. एक मूळची कथा इकडल्या काळाशीं आणि परिस्थितींशीं सदृश अशी कल्पून नांवें वगैरे बदलून आपल्या लोकांच्या समजुतींशीं शक्य तितकी जुळेल अशी रचना करणें. या प्रकारानें भाषांतर केलेलें मूळ कथानक आपल्या इकडलेंच बनतें. अशी रचना करण्यास कल्पकता आणि कौशल्य लागतें. या योगानें आपल्या वाङ्मयांत चांगल्या कृतींची भर पडते. दुसरा प्रकार मूळच्या कथेचें जसेंच्या तसें भाषांतर करणें. याच्या योगानें तिकडील विचार, व रीतिभाती कळण्यास साह्य होतें. उद्देश असेल त्याप्रमाणें दोन्ही प्रकार चांगलेच. दुसऱ्या प्रकारामध्यें मूळच्या कथेचें इंगित पूर्ण कळून भाषांतर चांगलें करावें लागतें. प्रस्तुतचें भाषांतर दुसऱ्या प्रकारचें चांगलें झाले आहे. अथेल्लो, देस्दिमोना, यागो, एमिलिया आणि क्याशियो या मुख्य पात्रांचे स्वभाव आणि तदनुरूप यांच्या कृत्यांचें वर्णन मराठींत चांगले सफाईनें उठवून दिलेलें आहे. या भाषांतरांतील एक उतारा निबंधमालेंतील 'भाषापद्धती' या निबंधाच्या शेवटीं आहे.

या काळांतले आणखी एक प्रख्यात निबंधकार गोपाळराव हरी देशमुख हे होत. ह्यांचे लेख पुस्तक रूपानें पुढें प्रसिद्ध झाले; पण या काळाच्या शेवटच्या सुमारें वीस वर्षांत लोकहितवादी या नांवानें त्यांनीं त्यांतले पुष्कळ लेख प्रसिद्ध केले. आणि त्यामुळें एक प्रकारचें लोकमतही उत्पन्न झाले. ह्यांची भाषासरणी मुंबईच्या वळणाची साधी आहे; आणि त्यांचा लिहिण्याचा ओघ बोधप्रद, निर्भीडपणाचा आणि प्रत्यय उत्पन्न करणारा असा असे. त्यांनीं इंग्रजी राज्याच्या आरंभीं पुष्कळ दिवस सरकारी नोकरी केली. त्यांत त्यांना अनेक जुने कागदपत्र पाहाण्यास मिळाले. यामुळें त्यांना पेशवाईच्या शेवटच्या काळाची माहिती फार होती. त्यांनीं पुष्कळ ऐतिहासिक आख्यायिका प्रसिद्ध केल्या आणि फार उपयुक्त माहितीचा प्रसार केला. या गोष्टी लोकांना नवीन आणि नवल वाटण्या सारख्या होत्या. त्यांनीं आपल्या लेखांत आमच्या तत्कालीन आणि पेशवाईच्या अखेरच्या लोकस्थितीवर कडक टीका केली आहे. त्या लेखां-

वर विष्णुशास्त्री चिपळुणकर यांनीं फारच कडक अशी प्रतिटीका केली आहे. पेशवाईच्या अखेरच्या काळांत आपसांतील तंट्यांची आणि आपापले मतलब साधण्याचीं देशाला नाशकारक अशी राजकारणें होऊन राज्य बुडाल्यावर इंग्रजांच्या सुखकारक मानलेल्या राज्यांत लोकांच्या मनांची जी स्थिती होती, तिच्यामुळें लोकहितवादीच्या सारखीं मतें प्रचलित झालीं होतीं. याचें आश्चर्य वाटावयास नको. लोकहितवादींचे लोकस्थितीवरील चर्चात्मक लेख हे त्या काळच्या वाङ्मयांत चांगल्यापैकीं आहेत. यांनी राजस्थानाच्या इतिहासांतल्या भागांचीं आणि दुसऱ्या अनेक लेखांचीं भाषांतरें केलीं आहेत. गुजराथ आणि सौराष्ट्र यांचे इतिहासावरही त्यांनीं लिहिले आहे. त्यांची भाषांतर करण्याची हतोटीही चांगली आहे. त्यांनीं कित्येक उपयुक्त संस्कृत ग्रंथांचींही भाषांतरें केलीं आहेत. यांचा एकंदर लेखसंग्रह फार विस्तृत आहे. एवढा मोठा ग्रंथकार मराठींत अजूनही कोणी झाला नाहीं, असेंही म्हटलें तरी चालेल. हें काम त्यांनीं लोकाश्रयाची अपेक्षा न धरितां स्वतांचे खर्चानें आपल्या समजुतीप्रमाणें लोककल्याणासाठीं केलें, ही गोष्ट लक्षांत घेण्यासारखी आहे. यांचे सर्व लेख संकलित रूपानें १८७० सालच्या पुढें प्रसिद्ध झाले, आणि स्वतंत्र पुस्तकेंही तेव्हांच निघालीं.

या काळांत कोणी महाकवी झाला नाहीं, आणि किरकोळ कविताही अगदीं थोडी झाली. या वेळची कृष्णशास्त्री चिपळुणकर यांची मागें सांगितलेली कविता आणि राजवाडे यांचें ऋतुवर्णन काव्य हीं उत्तम आहेत. राजवाडे यांनीं अलंकारशास्त्रावरही एक लहान पुस्तक लिहिलें. या काळाचे अखेरीस कुंटे यांचें नव्या तऱ्हेचें 'राजा शिवाजी' काव्य प्रसिद्ध झालें. या कवीनें जुनी अलंकारिक आणि कृत्रिम आणि संस्कृत-शब्द-मय काव्यरचनेची पद्धत सोडून साध्या सोप्या भाषेत शिवराजचरित्र वर्णण्याचा प्रयत्न केला. पण त्या वेळीं हें काव्य लोकांना आवडलें नाहीं. यावर तें भिकार म्हणून कडक टीका झाल्या. प्राचीन मराठी कवितेचीच फक्त गोडी लागलेल्या कानांना हें नवीन तऱ्हेचें काव्य रुचलें नाहीं यांत नवल नाहीं. पण सांप्रत मराठी कवितेला जें नवीन वळण लागलें आहे, त्यामध्यें या काव्याला बराच वर मान द्यावा लागेल. यासाठीं यावर झालेल्या कडक टीकेचें निवारण झालेलेंच बरें. परंतु या कडक टीके-मुळें रागावून कवीनें हें काव्य अर्धेंच सोडून दिलें. ही मराठी वाङ्मयाची

मोठीच हानी झाली. या काळांतले वर्तमानपत्रांतील कित्येक लेखही स्मरणीय आहेत. ज्ञानप्रकाशांत ‘पिशाच’ या सहीचे कित्येक विनोदपर लेख आले होते. ते लौकिक विषयांवर टीकारूप होते. लोककल्याणेच्छूंत ‘गोल्या घुबड’ नांवाखालीं कित्येक प्रसिद्ध व्यक्तींच्या वर्तनावर टीकारूप लेख आले होते.तसेच कांहीं ज्ञानप्रकाशांतही आले होते. ही सभ्यारीतीची विनोदपर टीका इंग्रजी ‘पंच’ वगैरे पत्रांतून येते तशी होती. या पत्रांच्या आधारें एक हास्यरसपूर्ण नाटक रचिलें होतें. तें सांगलीकर नाटककार मंडळी करून दाखवी, आणि ज्यांचेवर ते लेख आले होते ती मंडळी मुद्दाम नाटक पाहाण्यास जाऊन पुढें बसत! ज्ञानप्रकाशांत ‘पढत मूर्ख’ सहीची कित्येक व्यक्तींवर विडंबनरूप पत्रे आली होती. या सर्व पत्रांतील थट्टा सभ्य तऱ्हेची असून तिचा कोणाला रागही येत नसे. मराठींतील विनोदी आणि विडंबनयुक्त वाङ्मयाचा हा पाया होय.

## १०. पन्नास वर्षांच्या शेवटींची स्थिती—

मराठी वाङ्मयाचा हा पन्नास वर्षांचा अल्पइतिहास वाचून वाङ्मयाची प्रगती चांगली समाधानक कारक झाली, असें म्हणणें रास्त होय. राष्ट्राच्या प्रगतीस एकाएकीं खंड पडून जें गद्यवाङ्मय तयार होत होतें, ते एखाद्या भूकंपाच्या तडाख्यामध्यें सांपडलेल्या मंदिराप्रमाणें एकदम गडप झालें. त्यानंतर केवळ त्याच्या आठवणानें नवीन वाङ्मय तयार होण्यास नवीन साधनें तयार नव्हतीं. असे असून एवढें तरी वाङ्मय तयार झाले, ही सुदैवाचीच गोष्ट होय. तसेंच लक्षांत ठेविलें पाहिजे कीं एकाद्या राष्ट्राचें वाङ्मय अशा अडचणींतून तयार होण्यास पन्नास वर्षे हा काळ अगदीच थोडा आहे. निबंधमालाकारांनीं सन १८७४ सालांत आपलें मासिक पुस्तक सुरू केलें, तेव्हां मराठी भाषा अत्यंत वाईट स्थितींत आहे, ती उत्तरोत्तर अधो-गतीस चाललेली आहे, हें जें म्हटलें, तें मुळींच खरें नव्हतें. निदान असें म्हणण्यांत अतिशयोक्तीचा भाग फार होता. या काळांत झालेले ग्रंथकार आणि ग्रंथ यांची हकीगत येथपर्यंत दिली आहेच. या काळांतले दोन उत्तम निबंधकार कृष्णशास्त्री चिपळूणकर आणि देशमूख यांनीच फक्त निर्माण केलेलें वाङ्मय पाहिलें तरी तें कोणत्याही पन्नास वर्षांच्या काळास भूषणीभूत होणारा योग्य आहे. [illegible]

चिपळूणकरांच्या भाषेच्या खालोखाल योग्यतेची असून, त्यांचे स्वतंत्र निबंध पुष्कळ आहेत. लोकस्थितीवर स्वतंत्र निबंध त्यांचे पूर्वी कोणीं लिहिले नाहींत. या वाङ्मयांत स्वतंत्र ग्रंथ नाहीत. केवळ निबंध आहेत हें खरें. पण स्वतंत्र ग्रंथ या काळानंतर दहा वर्षांनीं होऊं लागते, हें लक्षांत ठेविलें पाहिजे. मराठी भाषेचें उत्तम अंग जी जुन्या कवींचीं काव्यें, तीं बहुतेक सर्व छापून होऊन लोकांना कायमचीं वाचावयास आणि अभ्यासावयास हातीं आली होतीं. हें वाङ्मय जरी या काळांतलें नव्हे, तरी त्याची प्रसिद्धी एकंदर वाङ्मयाच्या प्रगतीस साधनीभूत झालेली आहे. तसेंच कृष्णशास्त्री चिपळूणकर, भांडारकर, मोडक, रानडे, परमानंद, गुंजीकर, मुंबईचे ओक, नागपूरचे ओक आणि पंडित, कुंटे, विष्णुशास्त्री पंडित, महाजनि, यांसारख्या मंडळींनें मराठींत ग्रंथरचना करण्यास आरंभ केला असतांना मराठी भाषा अधोगतीस चालली होती, असें म्हणणें केवळ अयोग्य होय. त्यानंतर आज पन्नास वर्षांनीं या काळांतल्या वाङ्मयाकडे दृष्टी दिली असतां हें म्हणणें आग्रहाचें आणि असमंजसपणाचें होतें, असाच प्रत्यय आलेला स्पष्ट दिसत आहे.

# ३—विष्णुशास्त्री चिपळूणकर
## आणि
## त्यांचे लेख

### १. चिपळूणकर यांच्या लेखांचें साधारण स्वरूप—

विष्णुशास्त्री यांचे सर्व लेख निबंधरूप आहेत. स्वतंत्र ग्रंथ असा त्यांनीं लिहिला नाहीं. ग्रंथ फार दिवस टिकणारे असतात, यामुळे त्यांतील विवेचन विचारपूर्वक करावें लागतें. निबंधांतील विवेचन जसें आज वाचलें आणि थोड्या दिवसांनीं विसरून गेलें, तसा प्रकार ग्रंथांचा नसतो. शिवाय निबंधांतील विषय तत्कालीन महत्वाचेच पुष्कळ असतात. प्रसंग निघून गेल्यावर त्यांची आठवण फारशी राहात नाहीं. त्याचप्रमाणे आमची स्थिती वाङ्मय-प्रगतीच्या संबंधानें अजून तयारीच्या रूपानें असल्यामुळे लेखांतील मतें कायमचीं स्थिर झालेलीं नसतात. प्रत्यक्ष लिहिणारासही कांहीं काळानें आपलीं मतें बदलण्याचा प्रसंग येतो. यामुळे निबंधांवरील टीकाही कायमची आणि पूर्ण अशी समजतां नये. चिपळूणकर यांचे कित्येक निबंध त्यांचे लहान मोठे ग्रंथ बनवितां येतील इतके मोठे आहेत. तरी त्यांतल्या प्रतिपादनाला आणि मतांला निरंतरचें स्वरूप आलेलें नाहीं. ते केवळ तत्कालीन महत्वाचे लेख होत.

पाश्चात्य देशांत नित्यांतले विषयांवर वर्तमानपत्रांतून टीका होते. नंतर ज्या विषयांवर विचार होऊन आणि लोकमत बनून कायमची ग्रंथ-रचना व्हावयास पाहिजे असते, त्यांवर तिकडे नामांकित मासिक आणि त्रैमासिक पुस्तकें आहेत, त्यांमध्ये लेख आणि निबंध येऊन चर्चा होते, आणि मग विषयाच्या महत्वानुरूप ग्रंथ होतात. मालाकारांचें धोरण आपल्या मालेला अशा प्रकारच्या मासिक अथवा त्रैमासिक पुस्तकाचें स्वरूप देण्याचें होतें. आम्हीं चिपळूणकरांच्या काळापासून तो अजूनपर्यंतही वर्तमानपत्रांच्या आणि थोडे बहुत मासिक पुस्तकांच्या काळांत आहों. आमचीं मासिक पुस्तकें अजून उच्च प्रतीचीं नाहींत. स्वतंत्र ग्रंथरचना नुकतीशी कोठें होऊं

लागली आहे. चिपळूणकरांच्या निबंधांचा चर्चात्मक विचार करितांना या गोष्टी लक्षांत घेतल्या पाहिजेत.

## २. लिहिण्याचें शिक्षण—

विष्णुशास्त्री यांचे वडील कृष्णशास्त्री हे त्यांच्या वेळचे उत्तम संस्कृत आणि मराठी भाषांचे पंडित होते. ते इंग्रजी भाषेतही चांगले प्रवीण होते. त्यांचे वाचन फार श्रेष्ठ प्रकारचें होतें, यामुळे त्यांची मतें नव्या प्रकारचीं बनलेली होती. त्यांच्याकडे जी सरकारी कामें असत, त्यांमुळें त्या वेळी होणारे सर्व मराठी ग्रंथ त्यांच्या हातीं येत, आणि तेव्हां लिहिले जाणारे लेख ही त्यांचे पुढे असत. त्यांनीं स्वतः सांप्रत चालू असलेल्या मराठी गद्याचा पाया घालून ते उच्च दर्जास आणून पोंचविलें हे मागील निबंधांत सांगितलेंच आहे. याशिवाय मराठी भाषा आणि वाङ्मय याचेवर त्यांचे घरीं चर्चा आणि संभाषणें चालत. यामुळे विष्णुशास्त्री यांस हायस्कुलांतील आणि कॉलेजांतील शिक्षणाबरोबर मराठी निबंधकार बनण्याचें उत्तम शिक्षण मिळालें. विष्णुशास्त्री हे तीव्रबुद्धीचे होते. त्यांच्या मनांत पित्याच्या सहवासामुळे लहानपणापासूनच संस्कृत, इंग्रजी आणि मराठी लेख वाचण्याची आवड उत्पन्न झाली होती. त्यायोगानें ते उत्तम लेखक बनून त्यामुळें आपल्या भाषेचें, वाङ्मयाचें आणि लोकशिक्षणाच्या कार्याचें मोठें हित झालें. ते बरें लिहितात असें दिसून आल्यावर त्यांचे वडील त्यांना शालापत्रकांत लिहूं देऊं लागले. शालापत्रक पुढे कांहीं दिवस विष्णुशास्त्र्यांच्या संपादणीखालीं होतें. त्यांना जें शिक्षण मिळालें होतें, आणि त्यांच्यामध्ये लेख लिहिण्याचें जें सामर्थ्य उत्पन्न झालें होतें, त्याचा लाभ आपल्या महाराष्ट्रास करून द्यावा, अशी उत्तम प्रकारची बुद्धी त्यांस होऊन स्वभाषेच्या वर्धनासाठीं उद्योग करण्याची त्यांना स्फुर्ती झाली, आणि त्यांनी आपल्या वडिलांनीं बरेच दिवस चालविलेलें काम जास्त उत्साहानें पुढें चालविलें.

## ३. आरंभीचे लेख आणि निबंध—

विष्णुशास्त्री प्रथम पांच सहा वर्षे शालापत्रकांत लिहीत. ते त्यांचे प्रथमचे निबंध चांगले होते. रासेलसाचें मराठी भाषांतर जरी त्यांच्या वडिलांचे नांवें मोडतें, तरी तें त्यांनीच केलेलें आहे. व्याकरणावरील निबंध विष्णुशास्त्र्यांनी लिहिले अशी कित्येकांची समजूत दिसत. तसें नसून ते

थोरल्या शास्त्रीबुवांनीं लिहिलें. पांच संस्कृत कवी यांवर त्यांनीं निबंध लिहिले. ते सांप्रत ग्रंथरूपांत आहेत. हे फार चांगले आहेत. त्यांमध्यें तरूण विद्वान लेखकाचा बहुश्रुतपणा, शोधकपणा, मार्मिकता, विषयग्राहकता, चिकित्सासामर्थ्य आणि मराठीवरील स्वाम्य दिसून येतें. हे निबंध लिहिण्याचे वेळीं त्यांच्या मनास उगाच कडक भाषेंत लिहिण्याचे त्यांचे पुढील वळण लागलेलें नव्हतें. या निबंधांत युरोपियन पंडितांच्या शोधकतेची त्यांनीं निर्मळ मनानें योग्य प्रशंसा केली आहे. हे निबंध इंग्रज ग्रंथकार जानसन यांच्या कविचरित्रांच्या धर्तीवर लिहिले आहेत. जानसन याच्या निबंधांत ड्रायडन आणि पोप यांवरील निबंध उत्तम मानले आहेत. प्रस्तुत मराठी निबंध त्यांच्याशीं साम्य पावतील. हे निबंध लिहिले, त्या वेळीं त्या कवींच्या आणि त्यांच्या ग्रंथांच्या संबंधाचे शोध हल्लीं इतके झाले नव्हते, आणि विशेषतः दोन निबंध अगदीं साधारण कवींवर लिहिलेले आहेत. यामुळें या निबंधांना थोडा नरमपणा आलेला आहे, असें कित्येकांस वाटतें.

हे निबंध शालापत्रकामध्यें प्रसिद्ध झाल्यावर विष्णुशास्त्र्यांनीं मराठी कविता आणि कवि यांवर त्या पुस्तकांतच लिहिण्यास सुरुवात केली. त्या विषयाच्या प्रास्ताविक निबंधामध्यें त्यांनीं मिशनरींच्या मराठी कवितेसंबंधी मतांवर कडक टीका केली. यामुळें शालापत्रकच बंद झालें. तेव्हां आपण एक स्वतंत्र मासिक पुस्तक काढावें असें विष्णुशास्त्री यांस वाटलें. निबंध-मालेच्या जन्माचें हें कारण होय.

### ४. मालेचा आरंभ—

विष्णुशास्त्री हे सन १८७१ सालीं बी. ए. झाले. पुढे कांहीं तरी लोकोपयोगी काम स्वतंत्रपणें करावें, असा त्यांचा हेतू होता. त्यावेळीं शिक्षकाचें काम करून त्याच्या बरोबर आणखी कांहीं देशसेवेचें काम करितां येण्यासारखें असे, कारण राजकीय वातावरण आणि सरकारचा पक्ष निराळे झालेले नव्हते. खेरीज तेव्हांचे शाळाखात्याचे डायरेक्टर कृष्णशास्त्री यांना फार मानीत असत. यामुळें त्यांनी १८७३ सालीं विष्णुशास्त्री यांस हायस्कुलांत नेमलें. सन १८७४ सालापासून त्यांनीं निबंधमाला सुरू केली. मालेचा उद्देश मराठी भाषेला उर्जित स्थिती आणावयाची आणि तिच्या द्वारें लोक-शिक्षणाचें काम करावयाचें हा होता. लोकांचीं दुर्मतें घालवून त्यांच्या मनामध्यें

*

देश, समाज, लोकस्थिती, या संबंधानें योग्य मतें उत्पन्न करणें, या द्वारें लोकशिक्षण करावयाचें असा उद्देश मालेंतील आरंभींच्या लेखांवरून दिसतो. त्यांनीं भाषा सुधारण्याचें काम प्रथमतः हातीं घेतलें.

भाषासुधारणेचें काम निराळें आणि लोकांच्या राजकीय आणि सामाजिक मतांना वळण लावणें निराळें. पहिल्या कामाला भाषेवर प्रभुत्व, बहुश्रुतपणा आणि नित्यवाचन या गोष्टी पाहिजेत. त्या विष्णुशास्त्री यांच्यामध्यें होत्या. परंतु दुसऱ्या कामास आवश्यक असा पोक्तपणा, मननशीलता, दुसऱ्याच्या मतांचा आदर आणि तद्विषयक सहानुभूती, शांतपणा, चौकसपणा, खोल निरीक्षण वगैरे गूण पाहिजेत, ते विष्णुशास्त्र्यांच्या आंगीं आलेले नव्हते. ते पुढें यावयाचे, पण अगोदरच त्यांनीं या बाबतींत लोकांना उपदेश करण्याच्या कामाचा भार घेतल्यामुळे त्यांची गती बंद झाली, आणि या दुसऱ्या विषयावरील त्यांचे विचार हिरवटच राहून गेले. त्यांचा एखादा पक्ष होता, अथवा त्यांनीं एखादें विशिष्ट देशकार्य आंगावर घेऊन प्रयत्न चालविला होता, असेंही नव्हतें. सभोंवर काय चाललें आहे हें पाहून—म्हणजे भोंवतालची मंडळी काय गप्पा मारतील त्या ऐकून— एखादें मत बनवावें, आणि मग त्यासच चिकटून राहून टीका करावी, अशा प्रकारचें त्यांचें काम चाले.

‘ भाषेची स्थिती ’ आणि ‘ मालेचा उद्देश ’ हे दोन प्रास्ताविक लेख झाल्यानंतर ‘ विद्वत्व आणि कवित्व, ‘ ग्रंथांवर टीका, ’‘ भाषादूषण, ‘ लेखन-शुद्धी,’ ‘ भाषापद्धती,’ ‘ वाचन,’ भाषांतर, ‘ ग्रंथांवर टीका ’ हे वाङ्मय-विषयक निबंध लिहिले. मध्यंतरी ‘इतिहास’ या विषयावर एक लेख लिहिला. त्या मध्यें वादग्रस्त विषयावर विचार आल्यामुळें प्रथमची खळबळ झाली. ‘ संपत्तीचा उपभोग,’ ‘ गर्व,’ ‘ लोकभ्रम,’ हे निबंध लोकमताच्या संबंधाचे आहेत. हे तिन्ही लेख चांगले उपदेशपर असून त्यांत पाश्चात्य शिक्षणानें बनलेलीं नवीन सुशिक्षितांचीं मतें प्रतिबिंबित आहेत. या प्राथमिक लेखांतील विषय त्यांच्या नांवांवरून स्पष्ट होतच आहेत. मालेवरून भाषा लिहिणें आणि एखाद्या विषयाचें चांगल्या प्रकारें प्रतिपादन करणें या गोष्टी ज्यांना शिकावयाच्या आहेत, त्यांनीं हे लेख स्वतां वाचून त्याचें परिशीलन केलें पाहिजे. तथापि या लेखांतील विषयांचें थोडें दिग्दर्शन करणें बरें. ‘ विद्वत्व आणि

कवित्व’ हा अगदीं साधा निबंध असून त्यांत चांगलें काव्य कोणतें आणि कवीच्या अंगीं कोणते गूण लागतात, हें सांगितलें आहे. ‘भाषांतर’ यांत चांगलें भाषांतर कसें करावें, याची दिशा दाखविली आहे. ह्या निबंधाचें विद्यार्थ्यांनीं चांगलें मनन करावें. ‘वाचन’ ह्या छोट्या निबंधांत वाचनापासून फायदे सांगून वाचावें कसें हें दर्शविलें आहे. ‘संपत्तीचा उपभोग’ यांत त्याच्या नांवाप्रमाणें संपत्तीपासून स्वतांला आणि परांना कसें सुख द्यावें, याचें विवरण करून युरोपियन राष्ट्रें संपत्ती मिळविण्यासाठीं दीर्घउद्योग करून तिचा उपभोग कसा घेतात, हें दाखविलें आहे. ‘भाषापद्धति’ यांत उत्तम भाषेचे दाखविलेले नमुने मननीय आहेत. ‘ग्रंथांवर टीका’ यांत टीकेपासून फायदा काय, खऱ्या टीकाकाराचे आंगीं कोणते गूण असावे, आणि टीका कशा प्रकारें करणें रास्त, हें सांगितलें आहे. याबरोबरच मालेंतील ‘टेंपेस्ट’ आणि ‘तारा’ या नांटकांवरील टीका आणि दुसऱ्या कित्येक टीका वाचाव्या. ‘लोकभ्रम’ या निबंधांत भूतें खेतें, देवदेव, नवस, अपशकून, फलज्योतीष इत्यादि गोष्टींवर असलेला जनांचा विश्वास कसा निरर्थक आणि अज्ञानमूलक असतो हें उत्तम रितीनें दाखविलें आहे. विधवा पुढें आली असतां कित्येकांना राग येतो हें दाखवितांना विधवेच्या दुःस्थितीचें जें हृदयद्रावक वर्णन केलें आहे, त्यावरून अशा स्त्रियांना दुःखविमुक्त करण्याचे प्रयत्न चिपळूणकरांना अमान्य होते असें कधीं ही कोणास म्हणतां येणार नाहीं. या निबंधांच्या रूपानें विष्णुशास्त्री यांची उत्तम भाषासरणी पुढें आली.

माला सुरू झाल्यावर प्रथमतः लोकांचें लक्ष तिच्या नवीन ठसकेदार अशा उत्तम भाषेकडे आणि मालेंतील निर्भय, निर्भीड प्रतिपादनाकडे गेले. अशा प्रकारचें लिहिणें आणि विचार अगदीं नवीन होते. त्या वेळपर्यंत लोकांच्या समजुती अशा होत्या कीं इंग्रजी राज्याच्या छायेखालीं सर्व हिंदुस्थान देश एकवटला आहे, देशांत शांतता होऊन उत्तम राज्य मिळालें आहे, सर्वत्र आबादानी आहे, विद्याप्रसार होत आहे, भाषेची ही अभिवृद्धी होत आहे, तेव्हां सर्वत्र आनंद आहे. फार वर्षें धांगडधिंग्याचीं आणि अस्वस्थतेचीं गेल्यानंतर असे सुराज्य मिळालें, आणखी काय पाहिजे? त्या शांततेच्या काळाच्या मानानें भाषा, वाङ्मय, लोकशिक्षण, यांची आस्ते आस्ते बरीच चांगली प्रगती होत होती.

त्या वेळच्या भाषेच्या प्रगतीचें वर्णन या पुस्तकांतील मागल्या निबंधाचे अखेरीस केलेंच आहे. निबंधमाला सुरू झाल्यावर तिची जोरदार आणि मनोवेधक भाषासरणी, निर्भीड प्रतिपादन आणि अगदीं नवीन विचार या योगानें लोकांत खळबळ उत्पन्न झाली. त्यांतही सात आणि आठ या अंकांतील 'इतिहास' या निबंधांत युरोपियन लोकांवर आणि मिशनरींवर सणसणीत व स्पष्ट टीका आल्यामुळें खळबळ फारच वाढली. हा प्रकार सर्वांनाच फार अपूर्व वाटण्यासारखा होता. त्या वेळीं देशस्थितीबद्दल शांततेचे व समाधानाचे विचार मागें पडूं लागून इंग्रजी शिक्षणामुळें आणि इंग्रजी भाषारूप वाघिणीचें दूध प्याल्यानें आणि त्या भाषेंतले राजकीय व ऐतिहासिक ग्रंथ नुकतेच वाचावयास मिळूं लागल्यानें लोकांचे किंचित् डोळे उघडून त्यांना आपली खरी स्थिती दिसूं लागली होती. असंतुष्टतादर्शक उद्गार बाहेर पडण्याच्या बेतांत होते, परंतु पहिला धीर कोणास होत नव्हता. मालेच्या द्वारें त्यांचा एकाएकीं स्फोट झाला. परंतु या गोष्टीला लोकांच्या मनांची तितकी सार्वत्रिक तयारी नव्हती, यामुळें खळबळही फार झाली.

विष्णुशास्त्री यांनीं 'भाषादूषण' या निबंधांत मराठी भाषेविषयीं निराशेचे उद्गार काढले आहेत. भाषेची स्थिती वाईट असून ती अधोगतीस चालली आहे, असें त्यांनीं लिहिलें आहे. परंतु हें त्यांचें म्हणणें चुकीचें कसें होतें, हें मागील निबंधाच्या अखेरीस दाखविलेंच आहे. त्या वेळीं विष्णुशास्त्री यांना साक्षीकरितां उभे करून कृष्णशास्त्र्यांचे व इतर लेखकांचे ग्रंथ, इतकें कशाला, केवळ त्यांचींच पुस्तकें रासेलस आणि संस्कृत कविपंचक एवढींच त्यांच्या पुढें ठेविलीं असतीं आणि 'अशी ही भाषा अधोगतीस चालली आहे काय हो?' असा प्रश्न त्यांस विचारला असता तर आपलें म्हणणें बरोबर नाहीं, असें त्यांना खास कबूल करावें लागलें असतें. हें जें त्यांनीं म्हटलें आहे, तें त्यांच्या पुढील उद्योगास उठाव देण्यासाठीच केवळ म्हटलेलें आहे. कोणीं असें ही म्हटलें आहे कीं विष्णुशास्त्र्यांचे अगोदर मराठींत गद्य नव्हतेंच. तें त्यांनींच प्रथम सुरू केलें. हेंही खरें नाहीं. खुद्द त्यांच्या वडिलांचें गद्य आणि लोकहितवादींचें गद्य हीं कमी प्रतीचीं नाहींत. त्यावेळीं भाषेच्या प्रगतीला चांगलीच सुरुवात झाली होती. आणि जगांतील नित्यक्रमाप्रमाणें ती प्रगती बरीच चांगली चालली होती. एवढें मात्र खरें कीं विष्णुशास्त्र्यांच्या भाषा

लिहिण्याच्या आणि प्रतिपादनाच्या नवीन शक्तीमुळें आणि त्यांच्या प्रयत्नांनी भाषेच्या प्रगतीचें पाऊल एकदम फार पुढें सरकलें, चालू असलेल्या प्रगतीला विशेष जोर आला, आणि भाषेचें एक नवीनच वळण सुरू झालें. भाषा दूषित होत आहे असें म्हणण्याचीं कांहीं कारणें विष्णुशास्त्री यांनीं सांगितलीं आहेत. तीं कारणें हीं योग्य नव्हतीं. या संबंधानें येथें जास्त न लिहितां वाचकांस 'मराठी भाषेची घटना' या पुस्तकांमध्यें पृ० ४०३ पासून ४१२ पर्यंत जी चर्चा केली आहे, ती वाचावयास सांगतों.

निबंधमालेंतले या पुढील लेख अधिकाधिक जोराचे येत गेले. आपले लेख आणि विचार लोकप्रिय झाले आहेत असें पाहून मालाकारांची आत्मप्रतीतीही वाढली; आणि त्या मानानें निरनिराळ्या ठिकाणीं चळवळ होत गेली. या पुढील लेखांचें परिशीलन करण्यापूर्वीं विष्णुशास्त्री यांची भाषापद्धती, निरनिराळ्या विषयांवरील विचार आणि प्रतिपादनाची तऱ्हा यांचें आणि त्यांच्या स्वभावाचें व परिस्थितीचें वर्णन केले असतां त्यांच्या सर्व लेखांचें स्वरूप कळण्यास बरें पडेल.

### ५. लिहिण्याची पद्धत—

विष्णुशास्त्री चिपळूणकर यांचे लेखांचें स्वरूप आणि ते निर्माण झाले तो काळ ह्या गोष्टी अशा प्रकारच्या आहेत कीं त्यांच्या महत्वाच्या संबंधानें एकमत होणें निदान त्यांच्या वेळीं तरी अशक्य होतें. कोणत्याही खळबळीच्या वेळीं सदसद्विचारापेक्षां मनोविकारास प्राबल्य असतें. शिवाय आमच्या लोकांमध्यें सार्वजनिक आणि लौकिक गोष्टींच्या संबंधानें विचार करितांना खासगी गोष्टी आणि मतें एकीकडे ठेवून समतोल बुद्धि राखण्याचें तत्त्व अजूनही आलेलें नाहीं; मग तेव्हां तर नव्हतेच. यामुळें एका बाजूनें केवळ लेखांचा कडकपणा आणि लिहिण्याची फजीती करण्याची शिस्त पाहून 'वाहवारे शास्त्रीबुवा!' कशी मजा केलीत!' असे प्रशंसापर उद्गार निघाले तर दुसऱ्या बाजूनें हा केवळ पोरकट, टवाळ लिहिणारा आहे, याचें तोंड बंद केलें पाहिजे, असे धिक्कारयुक्त ध्वनी निघूं लागले. परंतु खरोखरी पाहातां विष्णुशास्त्री यांचे मित्र म्हणून जे मानले जात होते, त्यांनींच त्यांच्या मतांच्या आणि लेखांच्या संबंधानें विपर्यास करून आणि त्यांच्यावर भलभलती मतें आरोपून त्यांची नाचक्की केली आहे. या गोष्टीला आतां चाळीसांवर वर्षे होऊन

गेलीं. भाषेच्या उन्नतीचें त्यांनीं मोठें काम केलें आहे, हें सर्वपक्षांच्या लोकांना कबूल करणें भाग आहे आणि तसें झालेंही आहे. आतां दोषांची आठवण बुजून गूणच ध्यानांत राहाणार आहेत. शिवाय त्यांच्या लेखांचा चांगला अभ्यास सुरू झाल्यानें गुणाधिक्यच दिसून येईल असा भरंवसा आहे. यासाठीं विशेष चर्चा न करितां त्यांच्या भाषापद्धतीची तऱ्हा आणि निरूपणशैली यांचें यथातथ्य वर्णन केलें, म्हणजे खरें काय आहे हें पाहाण्यास सुलभ जाईल. असें करितांना त्यांच्या स्वभावाचेंही थोडें वर्णन करावें लागेल. यासाठीं अगोदरच स्पष्ट करून सांगतों, कीं यांत त्यांची निंदा करण्याचा यत्किंचित् हेतू नाहीं. त्यांच्या वाङ्मयसंबंधी कर्तृत्वाचें खरें स्वरूप ध्यानीं यावें म्हणून ज्या ज्या गोष्टी सांगण्याची जरूर आहे त्याच फक्त सांगण्याचा उद्देश आहे.

विष्णुशास्त्री यांच्या लेखांमधून जे दोष दृष्टीस पडतात ते त्यांच्या अंतःकरणप्रवृत्तीचे नसून केवळ बुद्धिमूलक आहेत. डा. जानसन याच्या संबंधानें गोल्डस्मिथ यानें म्हटलें आहे कीं, त्याचें अंतःकरण उदार आणि प्रेमळ होतें, परंतु त्याचें मन वाईट बनलेलें होतें. तोच प्रकार विष्णुशास्त्र्यांच्या संबंधानें होता. आपण आपल्या लोकांतले जानसनच आहों असें विष्णुशास्त्री यांस वाटे, यामुळें त्यांनीं जानसनची आढ्यता, प्रतिपक्षीयास तुच्छ मानून त्यावर तुटून पडणें आणि त्याचा अमर्याद उपहास करणें या लेखकीय गुणांचें सर्वत्र अनुकरण केलें आहे. जानसनाच्या वेळीं त्याच्या एवढा वाङ्मयांत विद्वान कोणी नव्हता. आमच्या इकडेही अशी स्थिती आहे, असें चिपळूणकर मानीत होते. चिपळूणकरांच्या अनेक प्रतिपक्षीयांनीं त्यांच्या विद्वत्तेचा फोलपणा अनेक वेळां उघड केला आहे. जानसन याच्या वावदूकपणाचें मेकालेनें जें वर्णन केलें आहे, त्याचा चिपळूणकरांनीं मोठ्या आढ्यतेनें उल्लेख केला आहे. हें वर्णन खुद्द मालाकारांना चांगलें लागू पडतें. जानसन हा मोठा सत्याभिमानी होता, आणि आवेश निघून गेल्यावर तो आपल्या चुक्या कबूल करी, असें चिपळूणकरांनीं लिहिलें आहे. परंतु त्यांनीं स्वतां यासंबंधानें जानसनाचा कित्ता कधींही वळविला नाहीं. जानसन स्वतां कांहीं पाहात नसे. तर भोंवतालच्या लोकांच्या सांगण्यावर विश्वास ठेवून मत बनवी. तशीच स्थिती चिपळूणकरांची होती. जानसनच्या सभोंवारचे लोकांत बरेच विद्वान

तरी होते. चिपळूणकरांच्या भोंवतालचें वर्तूळ केवळ अर्धशिक्षित अशा गंमत करणारांचें होतें. यामुळें या उत्तम लेखकाच्या खऱ्या कर्तृत्वावर पांघरूण पडलें आहे, तें आतां तरी निघालें पाहिजे. त्यांचे कडक लेख बहुतेक त्या वेळीं उपस्थित झालेल्या प्रकरणांसंबंधी होते. त्या गोष्टी आतां विस्मरणांत पडल्या आहेत, तेव्हां चिपळूणकरांच्या हातून घडलेल्या चुकाही विस्मरणांत पडल्या पाहिजेत. परंतु त्यांच्या कार्यातील गूण बाहेर काढण्यासाठींच दोष काळजीपूर्वक निराळे निवडून काढून फेकून दिले पाहिजेत.

विष्णुशास्त्री यांनीं भाषेस जें नवीन वळण लावून दिलें त्याचें वर्णन करतांना पहिल्या प्रथम ही गोष्ट सांगितली पाहिजे कीं इंग्रजी भाषेचें अनुकरण मराठींत करण्याबद्दल दुसऱ्यास दोष देणारे विष्णुशास्त्री यांनीं इंग्रजीचें अनुकरण जसें व जितकें केलें आहे, तसें व तितकें त्यांचे पूर्वी कोणींच केलें नव्हतें. मेकाले हा त्यांचा फार आवडता इंग्लिश लेखक होता. त्याच्या ठायीं त्यांची विरोधी भक्ति होती. मेकालेचे गुण आणि दोष या दोहोंचेंही त्यांनीं पूर्ण अनुकरण केले आहे. मेकालेच्यामध्यें आत्मविश्रब्धता हा मोठा महत्वाचा गूण होता. तो गूण उत्पन्न होण्याजोगी त्याची सर्व प्रकारें योग्यताही होती त्याचें फळही ग्रंथरूपानें इंग्रजींत कायमचें राहिलें आहे. इंग्रजींत मेकालेचे ग्रंथ आणि निबंध फारच आहेत. त्यानें उपहासपूर्ण असे जे टीकाविषयक लेख लिहिले, तेही आमच्या इकडल्याप्रमाणेंच तात्कालिक महत्वाचे होते. आतां त्यांचें महत्व नष्ट झाल्यामुळें ते लेखही मागें पडलें आहेत. त्याची ख्याती आतां त्याच्या स्वतंत्र ग्रंथांमुळेंच आहे. मेकालेच्या नंतर जे इंग्रजी ग्रंथकार झाले, त्यांनीं तर आतां इंग्रजीला निराळ्याच प्रकारचें सौम्य आणि भारदस्त स्वरूप आणिलें. यामुळें मेकालेची कीर्तीही अलीकडे मंदावत चालली आहे. चिपळूणकरांची ग्रंथरचना मेकालेच्या ग्रंथरचनेपेक्षां फारच कमी आहे. मेकालेच्या संबंधानें एका इंग्रज ग्रंथकारानें असें म्हटलें आहे कीं त्याचे गूण त्याचे लेखांतच राहिले आहेत. दोषांचें अनुकरण माल पुष्कळ करतात. तोच प्रकार आपल्या प्रस्तुत ग्रंथकाराच्या संबंधानेंही झाला आहे. त्याच्या भाषेच्या धोरणाचें जें वर्णन केलें आहे तें मेकालेच्या धोरणांशीं फार जुळेल. त्याचप्रमाणें 'इंग्रजी भाषा' या विषयाच्या पहिल्या निबंधाच्या शेवटीं चिपळूणकरांनीं मेकालेचे जे गुणदोष सांगितले

आहेत ते बहुतांशीं त्यांनाही लागू पडतील. तो भाग या प्रसंगीं अवश्य वाचावा.

विष्णुशास्त्री यांनीं मराठी लिहिण्यांत इंग्रजी भाषेची तऱ्हा उचलली आहे, हें मागें सांगितलेंच आहे. त्यांची मराठी भाषा उत्तम इंग्रजीप्रमाणें स्वतंत्र, प्रौढ, झोकदार, आवेशयुक्त व रसभरीत असते. त्यांनीं संस्कृतांतून निवडक असे प्रौढशब्द घेतले आहेत, आणि त्यांचा योग्य उपयोग करण्याचा कित्ता दाखविला आहे. त्यांतच चांगलीं अवतरणें, निर्देश आणि दृष्टान्त आहेत. तसेंच संस्कृतांतून आणि इंग्रजीमधून भाषेंत शोभतील असे अनेक नवे नवे विचार आणि रचना आणल्या आहेत. त्यांचें निरूपण चित्ताकर्षक असतें. त्यांना विवरणकौशल्य चांगलें साधतें; आणि एखाद्या विषयाचें प्रतिपादन करितांना ते स्वतां आणि वाचक उच्च, प्रौढ विचारांत गढून जाऊन दोघांचीही वर्णनामध्यें एकतानता होते. त्यांनीं इंग्रजींतून आणि संस्कृतांतून उत्तम प्रकारचे वाङ्मयपुष्पांचे घोंस निवडून काढून ते मराठींत गुंफवून दिले आहेत. ज्यांत मतभेदाला कारण नाहीं, असे त्यांचे लेख मनोवेधक उच्च भाषेंत असून त्यांत त्यांचें बुद्धिसर्वस्व प्रतिबिंबित झाले आहे. आणि वाचक त्यांतील आशय, मतें आणि निर्णय यांचें तेव्हांच ग्रहण करितो.

मालाकारांच्या एकंदर लेखांतला फार महत्वाचा असा एक गूण आहे. तो हा कीं त्यांच्या लेखांत जागजागीं जगांतील ऐतिहासिक प्रसंग आणि इतर अनेक गोष्टी, तसेंच होऊन गेलेल्या व्यक्ति, विशेष प्रसंग, स्थळें, ग्रंथ, ग्रंथकार आणि इतर प्रकार यांची विपुल माहिती दिलेली असते. विष्णुशास्त्री हे मोठे बहुश्रुत होते. त्यांनीं या आपल्या गुणाचा उपयोग वाचकांस चांगल्या प्रकारें करून दिला आहे. तसेंच त्यांच्या लेखांत विशेषतः टीपांच्या रूपानें नामांकित ग्रंथकारांच्या लेखांतले उतारे जिथे तिथे आहेत. त्यांच्या लेखामध्यें कसाही संबंध आणून जसा टीकेचा भडिमार असतो, त्याप्रमाणें कित्येक ठिकाणीं ही माहिती मुद्दाम ओढून संबंध आणून दिलेली आहे. पण ती अत्यंत मनोरंजक असल्यामुळें वाचकाला त्याचें कांहीं वाटत नाहीं. त्यांच्या लेखांच्या मनोवेधकत्वानें जसा उल्हास वाटतो, तसेंच या माहितीच्या योगानें मन उल्हसित होतें. या ठिकठिकाणच्या भरपूर माहितीचा विद्यार्थ्यांना तर फार उपयोग होईल.

ही स्थिती आरंभींची होती. परंतु पुढें वावदूकपणाला ऊत आल्यावर यांच्या भाषेंत दोषही फार शिरले. त्यांच्या ओघाबरोबर वाचक प्रथमतः जातो.

परंतु वादग्रस्त लेख पुन्हा पुन्हा वाचल्यावर मन संशयग्रस्त होऊन त्यांतील मतें स्वीकारण्यापूर्वीं चांगला विचार केला पाहिजे, असें निदान चाणाक्ष मनुष्यास वाटूं लागतें.

आपल्या प्रतिपक्षीयांस उद्देशून लिहितांना त्यांच्या लेखांत व्याजोक्ती आणि उपहास फार असतात. या गोष्टींत त्यांनीं प्रख्यात इंग्रज ग्रंथकार आडिसन याचें अनुकरण केलें. तें त्यांना म्हणण्यासारखें साधलें नाहीं. आडिसनच्या गंभीर, मुग्ध उपहासानें कोणाला राग येत नसे. परंतु प्रस्तुत लेखकाच्या उथळ उपहासानें आणि वारंवार त्याची आवृत्ती होऊन अतिरेक झाल्यानें त्याला वाह्यातपणाचें स्वरूप येऊन लोक चिडून जात, आणि त्या उपहासाच्या मुळाशीं द्वेष आहे असें वाटूं लागे. अशा प्रकारच्या लेखांमध्यें लेखकाचें मन समतोल न राहतां अतिशयोक्ती, अंतःकरणास झोंबेसें प्रतिपादन होत असे, आणि त्या लेखांची भाषा अधिकाधिक कर्कश, कटु आणि औपरोधिक होत चालली. आणि अशा प्रकारच्या लेखांची वाहवा होते असें दिसूं लागल्यावर पुढें लेखकाचे मनांत खोटा स्वाभिमान उत्पन्न होऊन दुसऱ्याचें विडंबन करून हास्य उत्पन्न करावें हेंच आपलें काम आहे, असें वाटूं लागलें. तो एक त्यांचा स्वभावच बनला. एक गोष्ट मात्र लक्षांत ठेवली पाहिजे कीं मालाकार अनुकूल, प्रतिकूल, वर्णनपर, टीकात्मक कसेंही लिहीत असले, तरी त्यांच्या भाषेचें वर्णन जें वर केलें आहे, तें नेहमीं बहुतेक सारखें लागू पडतें. कोणत्याही प्रकारचें लिहिणें असलें तरी भाषा लिहिण्याचे चांगले गुण त्यांच्या लिहिण्यांत कायम असतात. हें त्यांच्या भाषेवरील प्रभुत्वाचें लक्षण आहे. यामुळेंच त्यांच्या लिहिण्यांत वाचकाला गुंगवून आपले बरोबर ओढीत नेण्याची हातोटी चांगलीच आहे. वाचक शांतपणें मागाहून विचार करूं लागला, म्हणजे मात्र बहुत प्रसंगीं आपण फसलों असें त्यास वाटूं लागतें.

मालाकारांचें वक्तृत्व,* मोरोपंताची कविता, देशाची स्थिति वगैरे निबंध आणि अनेक ठिकाणचीं उपहासपूर्ण वर्णनें हीं वाचणारासाठीं लिहिलेलीं नसून ऐकणारासाठीं लिहिलेलीं व्याख्यानें आहेत. व्याख्याता एकामागून एक विचार सांगत जातो. ते सांगतांना श्रोत्याचें मन स्वाधीन राखण्यासाठीं तिखटमीठ लावून अतिशयोक्ती करितो. तसेंच बोलण्याबरोबर हावभाव, उच्च नीच स्वरोच्चार

*

वगैरे श्रोत्याच्या मनावर ठसा उमटविण्याचीं साधनेंही साध्य असतातच. ते ऐकतांना श्रोत्यास मधून विचार करण्यास विराम मिळत नाहीं. त्यांतच सभोवारच्या श्रोत्यांनीं माना डोलविल्या म्हणजे आपणासही मान डोलवावीशी वाटते. अशा रीतीनें श्रोत्यांच्या मनावर आपल्यास हव्या असतलि त्या परिणामांच्या लहरी उठवितां येतात. चिपळूणकरांचे नव्या उदात्त भाषेंत लिहिलेले लेख प्रथमच वाचतांना अशीच स्थिति होते. पुष्कळ वाचक वर्तमानपत्रांतील किंवा मासिक पुस्तकांतील लेख असेच वाचीत असतात, आणि केवळ एकदांच वाचतात. पण वाचक अभ्यासी बनला म्हणजे नामांकित लेख पुन्हा पुन्हा वाचूं लागतो. मग मनाला जास्त फुरसत आणि विचारशक्तीला जास्त वाव मिळून वाचक लेखकाच्या प्रत्येक विचारानंतर 'हें खरे का ?' 'हें असेंच का?' 'हे बरोबर आहे का ?' असे प्रश्न साशंकमनानें स्वतांसच विचारूं लागतो. यामुळें वरचें अवडंबर विरघळून जाऊन लेखांच्या विचारांचे खरे स्वरूप उघडे पडते. चिपळूणकरांचे वर सांगितलेल्या प्रकारचे लेख वाचतांना असें होतें कीं नाहीं, याचा प्रत्यक्ष अनुभव घेऊन पाहावा.

विष्णुशास्त्री यांचे सर्व टीकात्मक लेख तात्कालिक महत्वाचे आहेत. त्यांमध्यें पुष्कळ दिवस टिकण्यासारखें कांही नाहीं. अर्थात त्यांमध्यें तात्विक जोर नसून, त्याबरोबर असणारे यथार्थता, सूक्ष्मता, व्यक्तपणा, समतोलपणा, एखाद्या विशेषतत्वाचें आविष्करण यांतले, मौल्यवान वाङ्मयविषयक लेखांमध्यें असावयाचे गूण फारसे नाहीत. त्या त्या वेळीं जें मत उत्पन्न करण्याचा आशय असेल, किंवा जो बरावाईट हेतू साधावयाचा असेल, तो साधला म्हणजे कार्य झालें, असे ते समजत.

त्यांच्या निबंधाचा एक मोठा दोष असा आहे, कीं लिहितां लिहितां अनेक इकडचे तिकडचे आगंतुक विषय प्रतिपादनांत आणून त्यामध्यें, प्रसंग असो वा नसो, व्यक्ति, मतें आणि संस्था यांवर टीका करण्याचे काम ते साधून घेत. यामुळे लेख पाल्हाळिक होऊन, त्या वेळीं जरी मनोरंजक झाला, तरी पुढें त्याचें महत्व राहाण्यासारखें नसे. वक्तृत्व, मोरोपंताची कविता, हे लेख अशा प्रकारचे आहेत. वक्तृत्व या विषयांतील 'हितैषी' या नांवानें आलेली वा. आ. मोडक यांची टीका आणि मोरोपंतांच्या निबंधावर ओक आणि कानेटकर यांनीं केलेली चर्चा हे लेख या संबंधानें अवश्य वाचावे.

वक्तृत्व आणि मोरोपंताची कविता या दोन्ही निबंधांत—विशेषतः पहिल्या निबंधांत—त्यांच्या बहुश्रुतपणाचें आणि विद्वत्तेचे दर्शक असें विवरण पुष्कळ आहे. परंतु उपहास करण्याचे भरांत तें सर्व लोपून गेलें आहे.

विष्णुशास्त्र्यांच्या प्रतिपादनामध्यें दुसरी अशी गोष्ट दिसून येते की उपहास करणें हे–निदान त्यांच्या पुढाल लेखांत तरी–अगदी स्वाभाविक होऊन गेलें होतें. त्यांना मान्य अशी गोष्ट नमूद करितांनासुद्धां उपहासावर पर्यवसान होई. आपल्या लोकांनी चालविलेल्या उद्योगांमध्यें फारसें कांही अभिनंदनीय नाहीच; असलें तर थोडेंबहुत असेल, झालें; असा त्यांच्या मनाचा कल दृष्टीस पडतो. यामुळें चांगल्या गोष्टींची योग्य समजूत करून देण्याचा त्यांचा यत्न ही निष्फळ होतो. वेदान्त्यास सर्व सृष्टी जशी निस्सार, त्याप्रमाणें प्रस्तुत लेखकाच्या मतें आपल्याशिवाय इतरांचे विचार, वर्तन आणि कृती उपहासास्पद. याचें एकच लहानसें उदाहरण सांगतों. सर आलेक्झांडर ग्रयांट हे डायरेक्टर असतां त्यांनीं सरकाराकडून पूर्ण मदत घेऊन तुकारामाच्या अभंगांची उत्तम आवृत्ती काढविली. या गोष्टीविषयीं मोरोपंतावरील निबंधांत लिहितांना आरंभ अभिनंदनपर केला आहे. पण पुढें उपहासयुक्त लिहून त्या गोष्टींत कांहीं विशेष नाहीं, अशी वाचकाची भावना उदभूत केली आहे.

विष्णुशास्त्री हे अगदीं एकलकोंडे होते. स्वतांच्या अभ्यासाचे खोलीबाहेर त्यांचें जग नव्हतें. पुण्याबाहेर त्यांनी कधीं कांहीं प्रत्यक्ष पाहिलें नव्हतें. ते कधीं सभाव्याख्यानांना जात नसत, आणि स्वतःही सभेंत कधीं बोलले नाहींत. सभोंतालची मंडळी ज्या काय गप्पा मारीत त्यांवर विश्वासून ते आपलीं मतें बनवीत. या गोष्टीचा अयोग्य परिणाम त्यांच्या लेखांवर झालेला आहे.

### ६. इंग्रजी भाषा आणि डा. जानसन—

हे दोन लेख बी. ए.च्या अभ्यासास नेमले आहेत. हे दोन्ही उत्तम पैकीं आहेत. पहिल्या निबंधांत इंग्रजी भाषा आणि तींतील त्यांच्या वेळचे ग्रंथ, यांचें चांगलें विवरण केलें आहे. त्यांत निबंध आणि इतिहास याच विषयांवरील स्वरूपवर्णन आलें आहे. या वेळीं इंग्रजी भाषेंतील फार थोड्या पुस्तकांची आपल्या लोकांस माहिती झाली होती. तसेंच इंग्रजींतले मोठे मोठे ग्रंथकार आणि त्यांचे ग्रंथ हे त्या कालानंतरच झाले आहेत. इंग्रजी

वाङ्मयावरील चर्चात्मक मुख्य मुख्य ग्रंथही त्यानंतरचेच आहेत. यामुळे हा निबंध इंग्रजीचा अभ्यास करणाऱ्या हल्लींच्या विद्यार्थ्यास बराच नीरस वाटेल. पण मराठीमध्यें अशा प्रकारचे लेख कसे असावे, या संबंधानें नमुन्यादाखल असा हा निबंध उत्तम आहे. डा. जानसन हा इंग्रजातला योग्य पुरुष मराठींत अल्पचरित्र लिहिण्यासाठीं घेतला आहे. हा निबंध बहुतेक वाङ्मयचर्चा-विषयक आहे. जानसनचा स्वभाव, त्या वेळची लोकस्थिती, तत्कालीन विद्योपजीवी लोक, त्या वेळचें वाङ्मय आणि तत्संबंधाचें जानसन याचें कार्य, जानसनचें मित्रमंडळ, त्यांचे उद्योग आणि स्वभाव, ह्या गोष्टी चांगल्या प्रकारें वर्णिल्या आहेत. या दोन्ही निबंधांत वावदूकपणाला आणि कडक टीकेला स्थान नाहीं. पहिल्या लेखांत तसें कांहीं करितां आलें असतें. परंतु तसें फारसें केलेलें नाहीं. जानसनचा निबंध लिहिला त्या वेळीं जानसनच्या वेळची विद्याप्रसारासंबंधी लोकस्थिती आणि तो निबंध लिहिला तेव्हांची आमच्या इकडली लोकस्थिती या बऱ्याच अंशीं जुळतात असें वाटून लिहिलेला दिसतो. पण मराठी भाषेच्या संबंधानेंच पाहिलें तर अद्यापि देखील मराठी वाङ्मयाची स्थिती फार मागे आहे, असेंच म्हणणें भाग आहे. जानसन याच्यामध्यें साधारणतः नामांकित इंग्रज लोकांचे प्रतिरूप सांपडेल. यामुळें जानसनच्या निबंधांत वर्णिलेले त्याचे गुणदोष यांच्या योगानें इंग्रजांच्या गुण-दोषांचें स्वरूप चांगलें लक्षांत येईल. इतकेंच की जानसनचा काळ आणि सांप्रतचा काळ यांमध्यें फार मोठा फरक पडला आहे.

## ७. मोरोपंताच्या कवितेवरील निबंध—

हा लेख फार विस्तृत आहे. अशा प्रकारचा लेख उत्तम प्रकारें कसा लिहावा याचा कित्ता यांत चांगला घातलेला आहे. परंतु या लेखांतील विवरणाचें महत्व आतां त्यांतील प्रतिपादनपद्धतीच्या बाहेर फारसें राहिलेलें नाहीं. याचें कारण हा लेख लिहिला त्या वेळीं मोरोपंताचे सर्व ग्रंथ प्रसिद्धीस आले नव्हते, आणि त्या कवीच्या संबंधाची आवांतर माहितीही फार थोडी होती. तुलनेसाठीं इतर कवींची माहिती घ्यावयाची तीही तुरळकच होती. यामुळें या लेखांतील पुष्कळ गोष्टी आतां चुकीच्या ठरल्या आहेत. त्या वेळींही या गोष्टींची जी माहिती उपलब्ध होती, तिचें आकलन चिपळूणकरांनीं नीट केलेलें नव्हतें. नागपूरचे वामन दाजी ओक आणि इकडले कानेटकर हे मालाकरांप्रमाणेंच मोरोपंताचे चाहाते असून त्यांनीं त्यांच्या

अनेक चुकीच्या समजुती दाखवून दिल्या आहेत. त्या चांगल्या पदरांत पडल्या असून, 'आक्षेपकांनीं हे नीट वाचलेच नाहीं,' 'आमच्या लिहिण्याचा मागला पुढला संदर्भ पाहिला नाहीं,' 'असें आम्हीं म्हणणार होतों, चुकीनें राहिलें, तों आक्षेपकांनीं त्याचा फायदा घेतलाच,' अशा प्रकारच्या टोलवाटोलवीनें प्रसंग मारून नेला आहे. मोरोपंताच्या निबंधाबरोबर या दोघां विद्वान लेखकांचा पत्रेंही अवश्य वाचली पाहिजेत. एकंदरींत हा ऊहापोह फार चांगला झालेला आहे.

मोरोपंताचा निबंध केवळ वावदूकपणाचे प्रदर्शन करण्यासाठीच लिहिला. असे त्यांतील प्रतिपादनावरून दिसून येते. चार 'रथीमहारथीं'नी मोरोपंतावर केलेल्या आरोपांचे यांत विस्तृत खंडण केले आहे. ते आरोप फारसे महत्त्वाचे नव्हते. परंतु त्यामुळे आम्हीं मोठ्या लोकांवर–प्रत्यक्ष पित्यावरही–कसे लिहितो, हे लोकांना दाखविण्याचा प्रसंग साधून घेतला आहे. रानडे आणि वुइल्सन यांनी केलेल्या क्षुल्लक आरोपांचा तेव्हांही कोणास फारशी आठवण नव्हती. विस्तारामध्ये केलेल्या आरोपांस थोडेसे उत्तर पुरे होते. विष्णु-शास्त्र्यांचे वडील हे मोरोपंतास केवळ शब्द जुळविणारा आणि भाषांतरें करणारा लेखक म्हणत, ही केवळ तोंडची माहिती विष्णुशास्त्र्यांना माव होती. कृष्णशास्त्र्यांच्या लेखांत मोरोपंताचा जेथे संबंध आला, तेथे त्यांनी त्याला मराठींतल्या अग्रगण्य कवींत उल्लेखिलेला आहे. तेव्हां या संबंधानेंही खंडण करण्यास प्रवृत्त होण्याला स्वतांची प्रौढी मिरविण्यापलीकडे योग्य कारण नव्हतें.

## ८. विष्णुशास्त्र्यांचीं राजकीय आणि सामाजिक मतें—

येथवर विष्णुशास्त्री यांचे विद्यार्थ्यांना उपयुक्त असे भाषेसंबंधी आणि वाङ्मयविषयक लेख, त्यांची लेखनपद्धति आणि चर्चेची धाटणी यांचे विवरण केलें. हे सर्व आरंभीचे लेख बरेच शांतपणे लिहिले असून त्यांमुळे भाषेस चांगलें वळण लागले आहे. आणि भाषा आणि वाङ्मय यांचा अभ्यास कर-णारांस आणि स्वभाषेंत लिहिण्यास शिकणारांना ते फार उपयोगी आहेत. ह्याशिवाय त्यांचे सामाजिक आणि तशा प्रकारचे इतर विषय यांवर जे लेख आहेत, आणि त्या विषयांवर जागोजाग जे उद्गार आहेत, त्यांचा विद्यार्थ्यांस प्रत्यक्ष उपयोग नाहीं. राजकीय विषयांवर त्यांचा स्वतंत्र असा 'आपल्या

देशाची स्थिति' हा एकच निबंध आहे. विद्यार्थ्यांना चालू राजकारणाचा विशेष विचार करावयाचा नाहीं. तथापि या लेखांचा त्यांच्या एकंदर लेखांशीं निकट संबंध आहे, आणि त्यांवर या लेखांची माहिती झाल्यानें चांगला प्रकाश पडणार आहे. यासाठीं बाकीच्या लेखांचें अगदीं थोडक्यांत स्वरूप सांगितलें पाहिजे.

प्रथमतः त्यांच्या राजकीय आणि सामाजिक गोष्टींच्या संबंधाच्या मतांचा थोडा विचार करूं. मालाकारांचीं जातिभेद, स्त्रीशिक्षण, पुनर्विवाह, बालविवाह, स्त्रियांची आणि विधवांची स्थिती, अशा प्रकारच्या समाजसुधारणेच्या गोष्टी आणि इतर अनेक अज्ञानमूलक गोष्टी यांवरील मतें त्या वेळच्या इतर सुधारक लोकांप्रमाणेंच होतीं, असें त्यांचे आरंभींचे लेख वाचले असतां दिसून येतें. त्यांनीं 'हितेच्छू'स दिलेल्या प्रत्युत्तरांत या गोष्टींच्या मूलतत्वांना आपण विरुद्ध नाहीं, असें स्पष्ट सांगितले आहे. परंतु या तत्त्वांच्या नांवांवर मोडणारे ढोंगी लोकांचा आपण उपहास करितों, असें म्हटलें आहे. हें कितपत खरें आहे, हें त्यांच्या लेखांवरून दिसून येणार आहे, यासाठीं येथें जास्त चर्चा नको. ढोंगी लोकांचा उपहास करण्याच्या भरांत, आणि त्यांची लिहिण्याची पद्धत कुटिलपणाची असल्यामुळे त्यांच्या लेखांत मूळच्या तत्वांचीही भरपूर निंदा झालेली आहे; आणि आपण या मूळतत्वांना अनुकूल आहों, ही त्यांची जाणीव टीका करण्याचे भरांत नष्ट झाली आहे. ही गोष्ट उपहास करून लोकांची वाहवा मिळविण्याच्या भरांत होऊन गेली, अथवा त्यांनीं तसें मुद्दाम केलें, याचा निर्णय त्यांचे लेख आस्थापूर्वक वाचून करून घ्यावा हेंच ठीक आहे. लोकांच्या विचारांचा ओघ भलतीकडे चालला आहे तो मार्गाला लावावयाचा, हें त्यांच्या उद्योगाचें ध्येय आणि धोरण आरंभींच्या लेखांत चांगलें दिसून येतें. परंतु पुढें लोकप्रियतेच्या पाठीस लागल्यावर सर्वच घडी बिघडली आहे. गोष्ट चांगली, वाईट, उपयुक्त, कशी ही असो. ती त्या वेळीं विष्णुशास्त्र्यांना अप्रिय अशा "रावबहादुरादिकांनीं" काढलेली असली, म्हणजे तिचा उपहास करावयाचा हा त्यांचा बाणा झालेला होता. वक्तृत्वोत्तेजक सभा, स्वदेशी, व्यापारोत्तेजन अशा अनेक उपयुक्त गोष्टींकडे लोकांची प्रवृत्ती करण्याचें कर्तव्य करावयाचें टाकून, उपहास करून त्या संबंधानें लोकांच्या मनांत अनादर उत्पन्न करण्याचा त्यांचा प्रयत्न असे.

खरोखरी पाहिलें तर त्यांचीं या महत्वाच्या विषयांवरील-निदान त्यांपैकीं कांही विषयांवरील-मतेंच ठाम बनलेलीं नव्हतीं. यामुळें या कामांत ते लोकांचे मार्गदर्शक न होतां लोकमताच्या ओघाबरोबर वाहावत जाणारे ग्रामणी बनले होते. असा विद्वान मनुष्य व उत्कृष्ट लेखक या पंथाला गेला, ही आपली मोठी हानी झाली. यांनीं या गोष्टींचा जो उपहास केला, त्यामुळें त्यांचा ओघ बिलकुल न बदलतां तसाच जोरानें पुढें चालला आहे, हें सध्या आपण पाहात आहों. अगदीं नवीन गोष्ट बहुजनसमाजाच्या हातीं आली म्हणजे फाजील उत्साहानें तिच्या संबंधाच्या चांगल्या प्रकारांबरोबर वाईट प्रकारही येतात. परंतु पुढें चांगलें, सोयीचें आणि उपयुक्त तेंच टिकतें हा सृष्टिनियमच आहे. लोकमताच्या ओघाला चांगलें वळण लावण्याचा प्रयत्न करणें हें खऱ्या देशहितवाद्याचें काम आहे. परंतु चिडवणुकीच्या तत्वांचा अंगिकार करणें कधींही हितप्रद होत नाहीं.

यावरून असें मात्र दिसून येतें कीं मालाकारांचें लोकस्थितीसंबंधाच्या गोष्टींचे परिशीलन नीट नव्हते. इतकेंच नव्हें, तर त्यांचा त्यांतल्या अनेक गोष्टीविषयीं गैरसमज आणि दुराग्रह होता आणि लोकांच्या समजुतींच्या विरुद्ध जाऊन लोकप्रीतीला आपण मुकूं अशी भीती मनाला खात होती. तत्वें आपणास मान्य आहेत, असें जें त्यांनीं म्हटलें आहे, तें 'असा सुशिक्षित गृहस्थ या गोष्टींच्या विरुद्ध कसा?' हा साहाजिक प्रश्न उत्पन्न होतो, यामुळे म्हटलें आहे. राजकारणाच्या त्यांच्या मतांविषयीं ही अशीच स्थिती आहे. तत्संबंधाचा त्यांचा अभ्यास नव्हता. देशाच्या परिस्थितीची माहिती नव्हती, आणि घरांत बसून राहून सभोंवारचे लोक सांगतील त्यावर विश्वास ठेवावयाचा या त्यांच्या संवयीमुळें त्यांचीं भलतींच मतें बनलीं होतीं. प्रस्तुतच्या राजकीय विषयावरील निबंधांत देशस्थिती वाईट होण्याचीं कारणें सांगतांना त्यांनीं जी विचारसरणी स्वीकारली आहे, ती केवळ अशास्त्रीय, जगांतल्या अनुभवाविरुद्ध, कोत्या समजुतीची, आणि असत्य देशाभिमानाची आहे. तथापि त्यांनीं अखेरीस जो उपसंहार केला आहे, तो वाचून आश्चर्य वाटतें. त्यांत ते म्हणतात कीं आपल्या देशाची उर्जित दशा करून घेण्याचा मुख्य उपाय स्वातंत्र्य प्राप्त करून घेणें हा आहे. तें स्वातंत्र्य इंग्रज लोकांशीं लढून अथवा त्यांच्याशीं फटकून राहून प्राप्त होणार नाहीं.

तें प्राप्त होण्यास आणि वहिवाटण्यास आपले आंगीं अजून योग्यता आलेली नाहीं. ती योग्यता प्राप्त होण्याचा रामबाण उपाय लोक सुशिक्षित होणें हा आहे, शिक्षणाच्या योगानें आळशीपणा, स्वहित न कळणें, निष्काळजी-पणा, आपलपोटेपणा वगैरे दुर्गूण जातील, आणि आपल्या राज्यकर्त्यांच्या आंगचे चांगले गूण आपण घेऊं. अशा रितीनें आपल्या आंगीं स्वराज्य वहिवाटण्याची पात्रता येईल. हे विष्णुशास्त्र्यांचे 'आपल्या देशाची स्थिती' या निबंधाच्या अगदी शेवटचे विचार सांप्रत आपल्या सर्व विचारी लोकांना मान्य होण्यासारखेच आहेत. विष्णुशास्त्र्यांच्या या विचारांचें सार ओक यांच्या 'महाराष्ट्र वाङ्मयांत' पृ० ११६ ते ११९ मध्यें कलमें १५।१६।१७ यांत वाचावे. हे वाचतांना या निबंधाचा अगोदरचा भाग लिहिणारे आणि हा भाग लिहिणारे विष्णुशास्त्री ह्या भिन्न व्यक्ति असाव्या असें वाटूं लागते. यापुढे त्यांनी या संबंधानें कित्येक व्यक्ती आणि संस्था यांवर जी टीका केली आहे, तिचें थोडक्यांत स्वरुप सांगूं.

## ९. लोकहितवादी—

या ग्रंथकारांविषयीं मागील निबंधांत सांगितलें आहे. यांच्या लेखांवर चिपळूणकरांनी आठ निबंधांत विस्तृत चर्चा केली आहे. लोकहितवादी हे मोठे माहितगार गृहस्थ होते. स्वभाषेची आणि आपल्या लोकांची उन्नती व्हावी या गोष्टीची त्यांना मोठी कळकळ होती. त्यांची मतें त्या काळानुरुप होती. ते मोठे विद्वान होते असें नाही, विष्णुशास्त्र्यांच्या वेळीं पाश्चात्य लोक, पाश्चात्य विद्या आणि तिकडली राजकारणें यांची माहिती जितकी झाली होती, तिच्या दशांशही त्यांच्यावेळीं झालेली नव्हती, यासाठीं त्यांचेवर इतकें जहाल जाण्यांचे कांहीं कारण नव्हतें. आपल्या लोकांच्या अयोग्यतेचे मालाकारांनीं स्वतां अनेक ठिकाणीं योग्य वर्णन केलें आहे. परंतु ताक देण्याचा अधिकार सासवेचाच आहे, सुनेनें तो कां घ्यावा, या न्यायानें लोकहितवादीनें खुद्द त्यांच्यासारख्याच स्पष्ट भाषेत काढलेले दोष माला-कारांना खपले नाहींत. तत्वतः पाहिलें तर मालाकार आणि लोकहितवादी यांची देशस्थिती आणि लोकस्थिती या संबंधाचीं मतें फारशीं भिन्न नव्हतीं. फरक काय तो तीं नमूद करण्याच्या बाबतींतच होता. विनायक कोंडदेव ओक यांनी 'महाराष्ट्र वाङ्मय' या पुस्तकांत लोकहितवादी, चिपळूणकर आणि आगरकर या तिघांचीं

मतें सूत्ररूपानें एकत्र दिलीं आहेत. तीं वाचलीं असतां अनेक गोष्टींत तिघांच्या मतांचा मेळ पाहून वाचकांना आश्चर्य वाटेल. तथापि हें आश्चर्य ह्या तिघांचीं अशी मतें होतीं याबद्दलचें वाटणार नाहीं, तर तिघांच्याही संबंधानें लोकांनीं केलेल्या विपर्यासाचें आश्चर्य वाटेल. लोकहितवादीच्या संबंधाच्या प्रतिपादनांतील एक दोन गोष्टी येथें सांगितल्या म्हणजे त्यांतील अयोग्य टीकेचा मासला दिसून येईल. ब्राह्मण वेद नुसते पाठ करितात, तेव्हां ते ठोंब्ये आहेत असें लोकहितवादीनें म्हटलें. त्याचा मालाकारांना मोठाच राग आला. पण वेद नुस्ता पाठ करणारांना तीन हजार वर्षांपूर्वीही 'ठोंब्ये' म्हणत असें यास्कऋषीनें आपल्या निघंटूंत सांगितलें आहे. प्रत्यक्ष ऋग्वेदांतही 'हे ब्राह्मण बेडकांसारखे कर्णकटु ओरडत आहेत' अशी थट्टा केलेली आहे. लोकहितवादीचे पुष्कळ ग्रंथ केवळ इंग्रजीचीं भाषांतरें आहेत, आरंभीची प्रस्तावना तेवढी त्यांची आहे, असा उपहास केला आहे. परंतु लोकहितवादीचीं रजपुतांच्या इतिहासाचीं आणि इतर भाषांतरें उत्तम आहेत. त्यांच्या वेळीं मराठींत ज्ञान आणण्याचा भाषांतर हाच प्रशस्त मार्ग होता. त्यांनीं कित्येक संस्कृत ग्रंथांचीं ही भाषांतरें केलीं आहेत. आश्वलायन सूत्राच्या भाषांतराची मालाकारांनीं थट्टा कां केली हेंच समजत नाहीं. अशी टीका करितांना मालाकार आपल्या वडिलांनी उत्कृष्ट भाषांतरें करूनच मराठीला चांगलें वळण लाविलें, आणि आपण स्वतां चांगल्या भाषांतराची आपल्या 'भाषांतर' या निबंधांत प्रौढी गाईली आहे, या गोष्टी सोयीवारच विसरून गेले होते.

## १०. मिशनरी लोकांवरील टीका—

चिपळूणकरांनीं आपल्या लेखांत अनेक ठिकाणीं मिशनरी लोकांवर फार कडक टीका केली आहे. अन्यधर्मीयांची टवाळी करण्याचें आमच्या लोकांचें शील नाहीं. प्राचीनकाळापासून आमच्या लोकांनीं इतर धर्मीयांना आपल्या जवळ मोठ्या कुशलतेनें ओढून घेतलें आहे. यामुळेंच आमचा धर्म 'हिंदू' या नांवानें टिकला आहे. दुसऱ्या धर्माची टवाळी करण्याची तऱ्हा प्रथमतः ख्रिस्ती मिशनरींनींच आह्मांस शिकविली. तथापि त्यांचें अनुकरण करणें हें मालाकारांस योग्य नव्हतें. आतां हा विषय अगदीं मागें पडला आहे. कारण आपले लोक ख्रिस्ती होतील अशी भीती आतां फारशी उरली नाहीं. मिशनरी लोकांचे विचारही आतां बदलले आहेत. मनुष्याचें तारण

*

केवळ ख्रिस्तावर विश्वास ठेवण्यानेंच होईल, हा त्यांचा आग्रह आतां निर्जीव झाला आहे. आमच्या देशांतील अनेक भक्तिमार्गांप्रमाणें आमचा ही एक भक्तिमार्ग आहे, असें त्यांच्यांतील अनेक लोक आतां म्हणत आहेत. मागें ते ज्या साधूंची निंदा करीत, त्याच नामदेवतुकारामादिकांचे उत्तम अभंग वगैरे घेऊन त्यांचें भाषांतर करून ते आपल्या स्तोत्रांच्या जोडीला मांडीत आहेत. मिशनरींविषयीं विचार करितांना त्यांनी पाश्चात्य विद्या प्रथमतः आपल्यास शिकविण्याची कामगिरी केली, आणि आमच्या अनेक धर्मग्रंथांना जगापुढें आणून ठेविलें. हे त्यांचे उपकार विसरणें उचित नाही.

## ११. प्रार्थनासमाज—

चिपळूणकर यांच्या एकंदर लेखांचें —निदान पुढील लेखांचें—मुख्य धोरण दुसऱ्याने जें काम केलें असेल त्याचा उपहास करून कटु भाषेंत टीका करावयाची, आणि सदर्हु गोष्टीबद्दल लोकांच्या मनांत अनादर उत्पन्न करावयाचा, हें होतें. या त्यांच्या रीतीप्रमाणें त्यांनी प्रार्थनासमाजावर वारंवार लिहिलें आहे. निबंधमालेंत वक्तृत्व या विषयावर आणि केसरीमध्यें अनुकरणावर लिहितांना त्यांनीं विशेष जोराची टीका केली आहे. या टीकेला तेव्हांचे तेव्हां समर्पक उत्तरें मिळालीं आहेत. विशेषतः ' हितेच्छू ' या सहीनें वा. आ. मोडक यांनीं दिलेल्या उत्तरानें मालाकारांची चांगली कानउघाडणी झाली आहे. ' हितेच्छू 'चीं पत्रें निबंधमालेंतच छापलीं आहेत, त्यांवरून मालेंतील प्रतिपादनाचे संबंधानें त्या वेळच्या प्रमुख मंडळीस काय वाटत होतें, हें दिसून येईल. लोकांचीं मनें ख्रिस्तीधर्माकडून फिरवावीं, आणि आपल्या लोकांना देवसेवेची चांगल्या विचाराची दिशा लागावी, यासाठीं हा धर्मपंथ उत्पन्न झाला. याच्यावर समाजामध्यें बायका केसांत गजरे घालून जातात, तेथले सभासद गाण्याच्या सुरावर डोळे मिटूनच प्रार्थना करितात, अशा प्रकारची बालिशपणाची टीका केली आहे. खुद्द मालाकारांना कोणताच धर्म नव्हता. एकोणिसाव्या शतकाच्या खडकाळ भूमीवर—निदान त्यांच्या स्वतांच्या मनावर—धर्मविचाराचें बीज रुजण्याची आशा नको, असा सिद्धांत त्यांनीं ठोकून दिला आहे. धर्मविचारांचा उपहास करण्याचें आमच्या लोकांचें ब्रीद नव्हतें, सर्व धर्मांत तथ्य आहे, असें आपण मानीत आलों, हें मागें सांगितलेंच आहे. शिवाय मालाकर्त्यांचीं मतें पाहिलीं तर उपहास करून

लोकांची वाहवा मिळविण्यापलीकडे त्यांना या संस्थेवर टीका करण्याचा अधिकार पोंचत नव्हता.

## १२. दयानंदसरस्वती—

हे हिंदुस्थानांतील प्रख्यात धर्मपंथ किंवा समाजपंथ जो 'आर्यसमाज' त्याचे संस्थापक होत. यांचा चिपळूणकरांनी आपल्या लेखांत नाहक उपहास केला आहे. दयानंदसरस्वती यांचीं धर्ममतें कोणास कशीं ही मान्य अमान्य असोत; पण त्यांनीं आपल्या लोकांचा ख्रिस्ती किंवा मुसलमानी धर्माकडे जाणारा ओघ थांबविला, आणि पुष्कळांच्या धर्ममतांस आणि दयाभूतपणास निराळें लोकोपयोगी वळण लाविलें. त्यांची विद्वत्ता व उद्योगशीलता मोठी होती. ते मोठे स्वदेशाभिमानी होते, आणि त्यांना आपल्या लोकांविषयींची खरी कळकळ होती. त्यांना अनेक अनुयायी मिळून त्यांचा एक जिवंत धर्म पंथ उत्पन्न झाला ही गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी आहे. आर्यपंथांतील लोक ख्रिस्ती किंवा मुसलमान झालेल्यांस पुन्हा हिंदू करून घेतात. इतकेंच नव्हे, तर ते परधर्मीयांस हिंदूही करून घेतात. अशा रीतीनें त्यांनीं आपल्या धर्मास जिवंतपणा आणला आहे. यांच्या पंथानें पंजाबांत आणि उत्तर हिंदुस्थानांत जागोजाग मुलामुलींच्या शाळा, कालेजें, गुरकुलें वगैरे स्थापून आणि लोकोपयोगी अनेक संस्था उभारून कसें देशकार्य चालविलें आहे, हें कोणासही सांगावयास नको. ते दुष्काळ वगैरे संकटांतही जनतेला फार साह्य करितात. दयानंदस्वामींची थट्टा करणाऱ्या पुणेकर मंडळीपेक्षां सहस्रपटीनें आर्यसमाज लोकोपयोगी कामें करीत आहे. 'एकोणिसाव्या शतकाच्या खडकाळ भूमी-वर'च दयानंदानें आपल्या लोकांना सुमार्ग लावून त्यांच्याकडून अनेक देशकार्यें करविण्याचा नवीन धर्मपंथ उभारून दिला, या गोष्टीचे कोणालाही कौतुक वाटलें पाहिजे. दयानंदसरस्वती आणि आर्यसमाज यांच्या देशकार्याच्या संबंधानें माहिती मिळविण्याची आणि आपला शिक्षणक्रम पुरा झाल्यावर कांहीं तरी देशकार्य करावें अशी ज्यांची इच्छा असेल, त्यांनीं लाला लजपतराय यांचा 'आर्यसमाज' हा इंग्रजींत लिहिलेला उत्कृष्ट ग्रंथ अवश्य वाचावा.

## १३. उपसंहार—

येथपर्यंतच्या प्रतिपादनावरून विष्णुशास्त्री चिपळूणकर यांच्या लेखांचे स्वरूप लक्षांत येईल. सांप्रत आपल्या लिहिण्याच्या पद्धतीला आणि विषय

प्रतिपादनाला ज्या तऱ्हेचें स्वरूप आलें आहे, ती तऱ्हा उत्पन्न करण्याचें श्रेय चिपळूणकर यांस आहे. त्यांचे अगोदर कित्येक वर्षे शांत, साधा असा भाषा-पद्धतीचा ओघ चालू होता. त्या ओघाला पाश्चात्य इंग्रजीपद्धतीचें वळण लागत चाललें होतें; आणि इंग्रजी विद्याप्रसाराच्या योगानें आपल्या लोकांचे सौम्य विचार मागें पडून नवीन स्वतंत्र विचार मनांत खेळूं लागले होते. ते प्रगट करून जुन्या भाषाप्रवाहाला नवीन तऱ्हेचा प्रवाह जोडून देण्याचें काम चिपळूणकरांनी केलें. प्रथमतः हा नवीन प्रवाह येऊन मिळाल्यावर एकंदर भाषाप्रवाह मोठ्या खळखळाटानें वाहूं लागला. त्याचें स्वरूप फेंसाळ झालें. परंतु त्याला हळू हळू संथपणा येत जाऊन खळमळ तळाशीं जाऊन बसला, आणि वरील फेस निघून जाऊन निवळ प्रशांत असा नवा प्रवाह पुढें चालू झाला. त्याला नूतन स्वरूप मिळाले ते कायमच राहिलें. चिपळूणकर यांनी ज्या विषयांवर कडक टीका केली आहे ते विषय बहुतेक सर्व तत्कालीन महत्वाचे होते. कित्येकांविषयीं लिहिण्याची नीट साधनें नसल्यामुळें त्यांचें विवेचन अपूर्ण होतें. यामुळें त्यांच्या लेखांतील अवगूण स्मरणांतून गेले आहेत, हे योग्यच आहे. त्यांच्या संबंधानें अनेक प्रकारचीं गैरसमजुतीचीं मतें पसरलेलीं आहेत. तीं त्याच्या एकंदर लेखांचे लक्षपूर्वक मनन केल्यानें नाहींशीं झालींच पाहिजेत. त्यांचे निबंध वारंवार अभ्यासासाठीं नेमले जाण्याचा संभव आहे. तसें होणें रास्तच आहे. त्यांच्या लेखांत भाषा आणि प्रतिपादन यांच्या संबंधानें विद्यार्थ्यांनी आणि मराठी भाषेत ग्रंथरचना करूं इच्छिणारांनी घेण्या-सारखें पुष्कळ आहे. तसेंच त्यांच्या लेखांतील गुणांच्या योगानें आपल्या मनांत स्वभाषेच्या योग्यतेचा खरा अभिमान उत्पन्न होण्यास साधन होणार आहे. ज्यांची ग्रंथकर्तृत्वाची धांव नसेल त्यांला निदान साध्या व्यवहारांतील भाषेस उत्तम वळण लागण्यास ही त्यांच्या लेखांच्या परिशीलनानें फार उपयोग होईल. तेव्हां आतां नवीन व्यवस्थित अभ्यास सुरू झाल्यानें त्यांच्या लेखांचें खरें मर्म आणि योग्यता कळून त्यांच्या उद्योगाचें योग्य चीज होईल असा भरंवसा आहे.